# वासंतिका.

हें नाटक

‘ भालचंद्र ’

‘ वेड्यांचें इस्पितळ, ’ ‘ नीलांबरी, ’ ‘ क्लबांचें बंड, ’ ‘ सासूबाई, ’
‘ बायकोचें भूत, ’ इत्यादि प्रहसनांचे

व

‘ पति-प्राप्ति, ’ ‘ लीलाध्याय, ’ वगैरे नाटकांचे कर्ते
यांनीं लिहिलें,



तें

रा. रा. शंकर नरहर जोशी, यांनीं
पुणें शहर येथें ८१८, सदाशिव पेठ,
‘ चित्रशाळा ’ छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

( आवृत्ति पहिली. )

सन १९१४.

किंमत १२ आणे.

# आभारप्रदर्शन.



श्रीभारत नाटक मंडळीनें प्रस्तुत नाटक शक्य तितके परिश्रम घेऊन नटवून सजवून पुढें आणिलें, ह्याबद्दल त्या मंडळीचा मी अत्यंत आभारी आहें. त्यांच्या ह्या प्रेमाला आभारप्रदर्शनाची अपेक्षा नाहीं हें खरें; तथापि लेखक ह्या नात्यानें मला वाटणारी कृतज्ञता ह्या ठिकाणीं प्रगट केल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं. तसेंच ज्यांच्या प्रेमळ उत्तेजनानेंच मला वाङ्मयाची अल्पस्वल्प सेवा करण्याचें धैर्य दिलें व पर्यायानें प्रस्तुत नाटक मजकडून लिहविलें, ते माझे सन्माननीय मित्र सुप्रसिद्ध मनोरंजनकार श्रीयुत काशिनाथपंत मित्र यांचेही मी मनःपूर्वक आभार मानतों. त्याचप्रमाणें रा. रा. शंकरराव जोशी, व्यवस्थापक चित्रशाळा, पुणें, ह्यांचें पुस्तकप्रकाशनाच्या कामीं मला इतकें साहाय्य झालेलें आहे, कीं त्यांचेही आभार मानणें माझें कर्तव्य होय.

जळगांव,
कार्तिक शुद्ध १ शके १८३६.

'भालचंद्र.'

# अर्पणपत्र.

श्रीभारत नाटक मंडळीस

ही कृति

सप्रेम समर्पण केली असे.

'भालचंद्र.'

# वा सं ति का.

## अंक पहिला.

### प्रवेश पहिला.

**स्थळ**—अरण्य.

[ वासंतिकेवर वाघानें झडप घालून तिचा हात जबड्यांत धरला आहे असा देखावा.]

**वासं०**:—वाघा ! या वनामध्यें संचार करून तुझ्या तावडींत सांपडणाऱ्या प्रत्येक प्राण्यावर झडप घालण्यांत जरी तूं पटाईत असलास, गरीबगुरीब खेडवळांच्या गुराढोरांवर अंधाऱ्या रात्रीं छापा घालून अनाथ गाईंचा फन्ना उडविण्यांत जरी तुला भूषण वाटत असलं, तुझ्यावर चालून आलेल्या एखाद्या नवशिक्या शिकाऱ्याला बुजगावण्या दाखवून त्याच्या नरडीचा घोट घ्यायची जरी तुझ्या अंगीं शक्ती असली, तरी आज या वासंतिकेशीं गांठ आहे ..समजलास ? तुझा प्राण घ्यायला तुझ्यावर उगारलेली समशेर तुझ्या जबड्यांत माझा हात गुंतून राहिल्यामुळं जरी निःशक्त झाली, तरी माझा डावा हात माझ्या कमरेच्या खंजिरानं तुझा समाचार घेतल्या-वांचून रहाणार नाहीं. ( कमरेला खंजीर पहाते, पण तो नाहीं असं पाहून ) अगबाई ! या खंजिरानं ऐन वेळीं मला दगा दिला !

[ वीरराय येतो. ]

वीर०:—या वीररायाचा भक्कम हात तुझ्या सेवेला तत्पर असल्यावर ऐन वेळीं दगा देणाऱ्या तुझ्या त्या खंजिराची काय प्रतिष्ठा ? वासंतिके ! घाबरूं नकोस, या भाल्याच्या काठीच्या एका रट्ट्यानं हा वाघ पळ काढण्यांत किती पटाईत आहे, हें तुला दाखवितों.

[ भाल्याची काठी उगारतो. ]

वासं०:—हं खबरदार ! हा वाघ जरी माझा प्राण घेऊं पाहतो आहे, तरी मी एकटी त्याचा समाचार घेईन. केरळसेनापति वीरराय केवढे का प्रतापी असेनात, पण या केरळराजकन्येचा हात वाघाच्या दाढेतून सोडवून ते आपल्याच हातांत घेणार ना ?

वीर०:—मी जरी त्या महत्पदाला योग्य नसलों तरी वासंतिकेच्या प्रेमदृष्टीच्या किरणरज्जूंनीं मी त्या पदाला जाऊं शकेन, आणि तसं झालं म्हणजे मग वासंतिके ! तूं आणि मी एकच आहों. तूं या वाघाला मारलंस काय किंवा मी त्याचा समाचार घेतला काय एकच होणार आहे.

[ भाला फेंकून वाघाला ठार करतो. ]

वासं०:—शेवटीं तुम्हीं माझं नाहींच ऐकलं. या वाघानं आजपर्यंत कितीएक अनाथ गाईचे बळी घेतले असतील ! त्या गाईप्रमाणंच ही वासंतिकाही अनाथ निर्बल आहे, अशा समजुतीनं त्यानं माझ्यावर झाप टाकली, पण माझ्या हातांतून निघणाऱ्या चार रक्तबिंदूवांचून त्याला कांहींच लाभ झाला नाहीं.

वीर०:—वासंतिके ! तुझ्या एका रक्तबिंदूकारितां केरळवीर शत्रूच्या रक्ताचा समुद्र साचवतील ! तूं राजकन्या आहेस, महाप्रतापी हरदेवरायाची तूं एकुलती एक कन्या आहेस, या केरळदेशाच्या प्रजेची तूं भावी राणी आहेस ! तुझ्या पवित्र दृष्टीबरोबर हजारों वीरांचे नेत्र तुझ्या पायांवर लोटांगण घालतील ! तुझ्या शब्दाचा प्रतिध्वनि हजारों खड्गाच्या खणखणाटानं ऐकूं येईल ! त्या खड्गाचो झळक पाहून सूर्यालाही आपले डोळे मिटावे लागतील ! खणखणाटासरशी बाहेर पडलेल्या ठिणग्या त्या खड्गाच्या मागं चिकटून धुमकेतूप्रमाणं शोभा देतील ! तुझ्या करुण-



**वासं०:—**हं खबरदार ! हा वाघ जरी माझा प्राण घेऊं पाहतो आहे, तरी मी एकटी त्याचा समाचार घेईन.

[ पान २.

वाणीनं फत्तराचे पर्वत विरघळून जातील ! त्या तुला तूं काळाच्या जबड्यांत सांपडलीस असतांना ह्या केरळसेनापतीनं—ह्या वीररायानं—तुझा प्राण घेऊं पहाणाऱ्या वाघाशीं झगडूं द्यावं ? तूं शूर आहेस, धैर्यशाली आहेस, मानी आहेस, प्रतिव्याघ्रांबरी आहेस ! पण तूं स्त्री आहेस, तुला मला सोडवलंच पाहिजे.

वासं०:—पण माझा हुकूम, माझा शब्द आपण मोडलाच ना ?

वीर०:—तुझा हुकूम मोडल्याबद्दल वाटेल ती शिक्षा भोगायला मी तयार आहे. वासंतिके ! तूं मला कोणची शिक्षा करणार ? आपल्या नेत्रकटाक्षांनीं मला जर्जर करणार काय ?

वासं०:—अंहः !

वीर०:—हो, तें पूर्वीच झालं आहे नाहीं का ? बरं मग या मधुर हास्याच्या झुळकेनं माझ्या हृदयसागरांत वादळ उठवून माझ्या मनाचं तारूं बुडवून टाकणार ? हो, पण त्याबद्दलही मला कुरकुर करायला जागा राहिली नाहीं. मग काय बरं ?—

वासं०:—या वेळीं आपल्या कल्पना स्वैर सोडूं नका ! माझ्या मुखांतून निघालेली शिक्षा अमान्य झाली—

वीर०:—वासंतिकेच्या मुखांतून निघालेली शिक्षा कोणती का असेना, ती या वीररायाला मान्यच आहे ! मला हत्तीच्या पायीं मरावं लागलं, चिडविलेल्या हिंस्र पशूंकडून मला हालहाल करून फाडविलं, तापलेल्या सांडसानं या वाघाच्या ठिपक्याप्रमाणं, माझ्या केसागणिक माझ्या अंगाला भोकं पाडलीं, तरी ती तुझी शिक्षा म्हणून मला सोसलीच पाहिजे.

वासं०:—हा वाघही पूर्वी मोठा पुण्यवान् प्राणी असला पाहिजे. त्याच्या पराक्रमामुळें त्याच्या अंगावरही रत्नजडित पदकं एकाकाळीं तारकाप्रमाणं लखलखत होतीं ! पण त्याची दृष्टि उलटी फिरल्यामुळं पाप-पुण्याच्या कल्पना बदलून त्याच्या हातून क्रूरकर्मं होऊं लागलीं आणि त्या आगीनं तीं रत्नं, तीं पदकं जळून जाऊन त्या डागण्यांनीं त्याच्या शरीरावर काळे डाग उमटले ! स्त्रियांसंबंधानं पुरुषव्याघ्रांची दृष्टीही अशीच फिरली आहे. स्त्रियासंबंधानं दररोज होणारे नवीन नवीन कायदे

शुद्धप्रेमाला व्यभिचार ठरवीत आहेत. या वाघाच्या कातड्याचा बावटा या आपल्या हातांतल्या भाल्यावर फडकूं द्या, आणि त्याच्या धाकानं पापी माणसांची पांचावर धारण बसूं द्या.

वीर०:—तुझी आज्ञा मला शिरसावंद्य आहे.

वासं०:—नाहीं ! एवढ्यानं कांहीं संपल नाहीं ! स्त्रियांचं रक्षण करण्याकरितां स्त्रीच्या वस्त्राचंच तुम्हांला कवच पाहिजे ! घाबरूं नका ! मी तुम्हांला लुगडं नाहीं नेसवीत ! या माझ्या रक्तवस्त्राचं चिलखत बनवा, तें आपल्या अंगांत घाला, आणि दुष्टाच्या तावडींतून अनाथ स्त्रियांचं रक्षण करा ! ऐकलीत माझी शिक्षा ?

वीर०:—असली गोड शिक्षा कुणाही वीराच्या नशिबीं विधात्यानं आजपर्यंत लिहिली नसेल ! व्याघ्रचर्माचा ध्वज स्त्रीजातीच्या शत्रूवर वाघाप्रमाणं झडप घालील, आणि तुझ्या या रक्तवस्त्राचं चिलखत माझ्या अंगांत शिरल्याबरोबर स्त्रीजातीच्या शत्रूच्या अंगांतून रक्ताच्या चिळकांड्या उडूं लागतील ! पण वासंतिके ! तुझ्या या रक्तबंबाळ कराचा स्वीकार मला करूं दे. अगोदर त्याच्यावरच्या जखमा मला नीट बांधूं दे, आणि मग त्याचं ओझं हातांत बाळगायची मला परवानगी दे.

वासं०:—ही जखम कांहीं विशेष खोल नाहीं ! पुरुषांच्या अन्याया-मुळं माझ्या मनाला होणाऱ्या जखमेइतकीसुद्धां ती खोल नाहीं.

वीर०:—अशा भाषणांनीं माझ्या हृदयाला किती खोल जखमा करते आहेस याची तुला कल्पना तरी आहे का ? मी जरी या केरळदेशाचा सेनापति असलों तरी त्या पदावर मला येऊन कितीसे दिवस झाले ? महा-राजांचा भाचा, तुझा आतेभाऊ श्रीकृष्णराय यानं माझ्या मार्गांत केवढालीं विघ्नं आणलीं ? माझ्या शीलावर आणि माझ्या पराक्रमावरच ना मी महाराजांची मर्जी संपादली ? या निर्मळ प्रेमावरच ना, माझ्या प्रीति-मंदिराची उभारणी केली ? वासंतिके ! पुरुषांचा अन्यायी जुलूम संपून लवकरच तुझ्या शुद्ध न्यायाचा सूर्योदय होणार आहे ! त्याच्या प्रखरतेनं पुरुषाच्या क्रौर्याचीं वनं जळून उध्वस्त होऊन व्याघ्रवृत्तींच्या नियमांना थाराही मिळणार नाहीं.

वासं०:—नाहीं वीरराय! नाहीं! ही अगदीं करकरीत तिन्ही सांजची वेळ आपल्या किर्र शब्दांनीं पापी निशादेवीच्या साम्राज्याची ललकारी वाजवीत आहे! या रात्रीच्या वेळीं विषारी सर्प, घाणेरडीं जनावरं, डाकिणी, भूतपिशाच्चं बेफामपणानं धिंगाणा घालण्याकरितां टपून बसलीं आहेत! त्यांच्या तावडींतून सत्वशील माणसांचा बचाव होणं दुरापास्त आहे. ही काळीरात्र, हा कृष्णांधःकार—श्रीकृष्णरायाचा हा मूर्तिमंत प्रकाश त्याच्या कृष्णकृत्यांना उजळा देऊन अधिक काळाकुट्ट बनविणार! वीरराय! आपल्या अंगालाही हा काळोख चिकटूं लागला आहे. त्याच्या स्पर्शानें आपण पुरे माखला नाहीं तोंच येथून पाय उचला! परमेश्वरा! पाड, असाच मोत्यांचा पाऊस पाड! असाच अमृतवर्षाव कर, आणि या वीराला—या वीरसूर्याला धुवून काढून त्याचं झळझळीत मुखकमल सूर्यबिंबाप्रमाणं झळकूं दे.

वीर०:—वासंतिके! या कृष्णराक्षसाचा नायनाट करण्याकरितां सात्विक देवतांनीं तारकांचे बाण सोडून सर्व नभोमंडळ व्यापून टाकलं आहे. तूंही आपल्या शुद्धप्रेमाच्या विद्युल्लतेनं आपला मार्ग मोकळा कर! उचल, उचल—पाऊल झपाझप! [ जातात. ]



## प्रवेश दुसरा.



स्थळ—उद्यान.

[ रुद्राक्षराय प्रवेश करतो. ]

रुद्रा०:—आमच्या या राज्यांत व्यभिचाराचा कायदा झाला, त्या वेळीं व्यभिचारी स्त्रीलाच जिवंतपणीं जाळण्याची शिक्षा ठरवली म्हणून

बरं ! पुरुषाला जाळण्याची जर कां त्यांत सोय केली असती, तर या केरळदेशांत पुरुषांचं निर्बीज होऊन स्त्रीराज्यच झालं असतं ! पण आतां लवकरच हें स्त्रीराज्यच होणार आहे नाहीं तर काय ? वासंतिका-ताईसाहेबांना चांगलं स्थळ दिसतांच त्यांच्या हातीं राज्यसूत्र देऊन महाराज स्वस्थ बसणार ! आणि आजच्या उलट स्त्रिया कायद्याच्या कचाट्यांतून सुटून पुरुषांना अग्निदेवतेचं पाणिग्रहण करावं लागणार ! आणि मग देवा ! आमच्यासारख्यांची अवस्था काय होणार !—माझ्या मनांत काल हे विचार डोकावूं लागल्यापासून वासंतिकेलाच प्रेमपाशांत अडकवण्याचा निश्चय केला. सामान्य बायकोला वळविण्याचे मार्ग आमच्या रोजच्या सरावांतले ! राजकन्येला कसं आळवावं, हें शिकण्याकरितां एका श्रृंगार-रसप्रधान नाटकांतलं नायकाचं काम वाचूं लागलों. पण तें सगळं अस्वा-भाविक वाटूं लागलं. तेव्हां स्वतः रचलेलं हें दुसरं काम तयार करण्या-करितां घेतलं, बहुतेक पाठ देखील झालं ? काय नामी शब्द हे ! ' प्रणयनंदिनी ! ' हा शब्द उच्चारला कीं ती आमची नंदिनी झालीच, आणि मग आम्हांला नंदी बनवून मग ती आमची वेसण हातांत ठेवणार ! हा ' चारुगात्री ' शब्द कांहीं बरोबर नाहीं. त्यापेक्षां ' जन्मदात्री '— ' जन्मदात्री ' शब्द चांगला ! आम्ही आमच्या प्रणयदेवतेला जन्मदात्रीच म्हणणार ! जन्मदात्री—जन्मदात्री—जन्मदात्री ! चला ताजाचा ताजा मासला राजकन्येला दाखवूं. अरे, पण ही चंडिका येते आहे. रंगीत तालीम करायला कांहीं हरकत नाहीं. बाकी राजकन्येच्या रंगाहून हिचा रंग कांहीं औरज ! चला नीट ऐटींत उभं राहून तयारी करूं या.

[ चंडिका येते. ]

चंडि०:—काय बाई बाबांना म्हणावं ? कधीं माझं लग्न करून टाक-ताहेत कुणाला ठाऊक ! ताईसाहेबांचं लग्न व्हायचं आहे ! तेव्हां त्यांच्या-बरोबर सरकारी खर्चानं माझं, जाईचं, जुईचं, चमेलीचं आमचीं सग-ळ्यांचीं लग्नं व्हायची आयती संधि आली आहे. तेव्हां निराळा खर्च कशाला करताहेत ! हें असो मेलं, पण स्थळ पाहून ठेवलं असतं तर ? पण तेंहीं नाहीं.

रुद्रा०:—( स्वगत ) स्थळाची कसली पंचाईत ! बाग नाहीं उपवन, उपवन नाहीं रान, रान नाहीं जंगल, जंगल नाहीं महाल, महाल नाहीं दिवाणखाना ! एखादा पडदा असला म्हणजे झालं ! त्याची कसली मोठीशी पंचाईत ?

चंडि०:—त्या मेल्या जाईजुईचं बरं कीं नाहीं ? त्यांच्याकरितां कितीक टपून बसले असतील ! पण माझ्याकरितां !—

रुद्रा०:—मी इतका बगळ्यासारखा टपून बसलों आहें. पण कांहींच नाहीं. पुढं जायला वेळच येत नाहीं !

चंडि०:—देवा ! सोडिवरे बाबा या संकटांतून !

रुद्रा०:—( स्वगत ) आलं रे आलं ! ( उघड ) सुंदरी ! भिऊं नकोस ! भिऊं नकोस ! हा रुद्राक्षराय रुद्राप्रमाणं तुझ्याकरितां सर्व विश्व जाळून टाकायला तयार आहे !

चंडि०:—पण तुमच्याशीं मला बोलतांना कुणी पाहिलं तर व्यभिचारिणी म्हणून मलाच जाळून टाकण्याचा हुकूम सुटेल ! माझी वाट सोडा, मी जातें बापडी !

रुद्रा०:—जाऊं नकोस ! जाऊं नकोस ! मी तुला कधींही अंतर देणार नाहीं ! मला एकदा परत बोलूं दें.

चंडि०:—हें असं आपण बोलूं लागला कीं, माझा पायच उठत नाहीं.

रुद्रा०:—मग त्यांत कांहीं नवल नाहीं ! मनरमणी ! तुझा हा सुंदर चेहरा भृंगपंक्तीनं सुशोभित झालेल्या मृत्तीकेच्या कुंभाप्रमाणं दिसतो आहे. तुझं हें डौलदार शरीर वाळलेल्या वेलीप्रमाणं सतेज दिसतं आहे. तुझी ही मंजूळ वाणी काकपक्षाप्रमाणं कर्णमधुर वाटत आहे.

चंडि०:—हें काय असलं भाषण ? मला नाहीं आवडत, पुरे करा गडे !

रुद्रा०:—एवढ्यांत कसं पुरं होणार ? माझ्या आकांक्षाची फलश्रुति तूं ! माझ्या जीविताची स्वामिनी तूं !

चंडि०:—हें काय बाई !

रुद्रा०:—माझा पुरुषार्थ तूं ! माझा पराक्रम तूं ! माझं शौर्य तूं !

चंडि०:—किती तरी बाई स्तुति करायची ! पुरे आतां.

रुद्रा०:—माझी धर्मभक्ति तूं ! माझी देशभक्ति तूं ! माझी पितृभक्ति तूं ! माझी मातृभक्ति तूं !

चंडि०:—इश्श मेलं ! असं काय बोलायचं ! आपण स्तुति करावी अशी कांहीं मी मोठी नाहीं !

रुद्रा०:—महाभारताहूनही तूं मोठी ! महासागराहून तूं विशाळ ! ष्टिसुंदरीहून तूं विशाळ !

चंडि०:—अगबाई ! आरशांत तर मला कधीं असं दिसलं नाहीं.

रुद्रा०:—आरसे महाठक आहेत ! आरशापेक्षांही तूं शुद्ध.

चंडि०:—पण आतां वर्णन आटपाना !

रुद्रा०:— बरं तर आतां एकदम शेवटचं घेतो. 'प्रणयनंदीनी' !— हा हा मार मुरका ! मार मुरका ! अस्सं ! चारुगात्री ! नाहीं नाहीं जन्मदात्री !

चंडि०:—आतां मी रागावेन हां !

रुद्रा०:—वा: ! मग मला पाहिजे तेंच मिळणार ! जन्मदात्री ! येत्या सोमवारीं पहाटे चार वाजतां मोतीबागेंत भेट ! तिथं सर्व तयारी करतों, तुला अर्धांगी करून सुखी करीन.

चंडि०:—पण हें खरंना ! नाहीं तर माझी फजिती होईल !

रुद्रा०:—सुंदरी, या तुझ्या नेत्रांमध्यें वास करणाऱ्या पृथ्वी, आप, तेज, वायु. आकाशआदि पंचमहाभूतांना साक्षी ठेऊन मी शपथ घेतों.

चंडि०:—शपथ कशाला ? माझा आपल्यावर विश्वास का नाहीं ! पहा, चाहुल आली; मी येतें आतां !

रुद्रा०:—ये हं ! ( चंडिका जाते ) कांहीं असो. मी भाषण पाठ म्हणायला लागलों, तों चंडिका खरोखरच मला सुंदर दिसूं लागली. तिचं चंडिका नांव काढून आपण पुढच्या खेपेपासून तिला चंद्रिका नांवानंच हांक मारूं ! असो, रंगीत तालीम कांहीं इतकी वाईट झाली

नाहीं. तरी पण वासंतिकेच्या पात्रांशीं गांठ पडेपर्यंत अजून बऱ्याच तालमी झाल्या पाहिजेत. [ जातो. ]



## प्रवेश तिसरा.



स्थळ--राजवाड्यांतील एक उपशाळा.

[ श्रीकृष्णराय व कोकिळा प्रवेश करतात. ]

कोकि०:—पण मीं हें काय म्हणून करूं ? त्यापेक्षां मला जीव घ्यायला कां सांगत नाहीं ?

श्रीकृ०:—अग-असं बघ—

कोकि०:—ज्यांची मी स्वामिनी—जे सर्वस्वीं माझे—त्यांना काय ताईमहाराजांनीं माळ घालावी असं मी करूं ? आणि त्याकरितां ताई-महाराजांची मनधरणी करूं ? इतकी का मी खुळी आहें ?

श्रीकृ०:—खरोखरच खुळी ! अग असं बघ, तिच्यावर का माझं खरं प्रेम आहे, म्हणून मनधरणी करायला सांगतों आहे तुला ? ही अवदसा मध्यें नसती, तर ह्या हरदेवरायमहाराजांच्या अफाट राज्याचा मी कृष्णराय त्यांचा भाचाच वारस नसतों का ? पण ही आडवी आली ! तिला ठार करून दूर करायची, हें तर कांहीं शक्य नाहीं ! तेव्हां तिचंच मन वळवून तें मजवर बसेल आणि ती मलाच माळ घालील, असं करण्यावांचून मार्ग आहे का दुसरा ? कोकिळे ! हीं वासंतिका आणि तिचं राज्य हीं एकदां माझीं झाल्यावर मग त्या प्रचंड राज्याची पट्टराणी तुझ्यावांचून दुसरी कोण बरं होणार ? तूंच सांग ?

कोकि०:—जसं कांहीं खरंच ! वासंतिकेसारखी सौंदर्याची पुतळी लाधल्यावर तिला टाकून या दासीकडे पहाल ?

श्रीकृ०:—कोकिळे ! प्रेम हें सौंदर्यावर का अवलंबून असतें ? आणि तसं असलं, तरी तिचे ते हरणासारखे नेत्र, ते विशाल भाल, तो गौरवर्ण, ती चाफेकळीसारखी नासिका, तें पोंवळ्यासारखे ओंठ, ते मोत्यासारखे दांत, हीं चटसारीं तुझ्या या मुखचंद्रावरून ओंवाळून टाकीन ! पण खरंच ! माझ्याबद्दल तिच्याजवळ कधींच का गोष्ट काढली नाहींस ?

कोकि०:—खरंच सांगूं का ? एकदां कुठं मी आपल्या रूपाचं आणि शौर्याचं त्यांच्याजवळ वर्णन करायला गेलें, तर बाई कपाळाला आठ्या घालून म्हणतात कशा, तुझ्या मनांत भरला आहे वाटतं तो ? पण बाई, त्याच्याशीं लगीन-बिगीन करायचा विचार मनांत आणूं नकोस हो ! साजेल तेंच मनांत आणावं ! तूं कोण ? तो कोण ? नाहींतर प्रेम मोठं आंधळं असतं ! त्याला कांहीं हें दिसायचं नाहीं ! मी मनांत म्हटलं, " लोकां सांगे ब्रह्मज्ञान, आणि आपण कोरडे पाषाण." त्यांतलीच गत !

श्रीकृ०:—काय ? ती दुसऱ्या कुणाच्या प्रेमपाशांत गुरफटलेली आहे की काय ?

कोकि०:—असं आपलं बाई मला वाटतं हो !–असल्या गोष्टी का कधीं झांकून राह्यच्या आहेत ?

श्रीकृ०:—कोण ? कोण ? माझा प्रतिस्पर्धी तरी कोण ? ते कळूं दे !

कोकि०:—दुसरं कोण ? सेनापति वीरराय !

श्रीकृ०:—अस्सं ! अस्सं ! मला हें स्वप्नच पडलं होतं म्हणा !-ठीक-ठीक ! वीरराय ! मला हाणून पाडण्याचा आपण अगदीं विडाच उचलला आहे ! रणांगणावरही तेंच ! राजमंडळांतही तेंच ! आणि इथंही तेंच !–पण तूं हें म्हणतेस तरी कशावरून ?

कोकि०:—बायकांच्या खुणा बायकांना का कळत नाहींत ? आपल्यारून जग ओळखावं ! वीररायाचं नांव काढलं कीं, कावरंबावरं होणं, एकदम प्रफुल्लित दिसणं, डोळे क्षणांत तेज:पुंज होणं; हीं बाईचीं लक्षणं ?

श्रीकृ०:—तूं म्हणतेस तें बरोबर ! पण याहूनही खात्रीलायक असं कांहीं आहे तुला ठाऊक ?

कोकि०:—याहूनही खात्रीलायक तें काय बाई असणार ? वीररायमहाराजांना भेटायला आले, नि त्यांचा आवाज ऐकूं आला, कीं कांहीं तरी निमित्त काढून महाराजांजवळ जाणं, तिथंच घटकानघटका घुटमळणं, तसंच ते गेले कीं, अगदीं दृष्टिआड होईपर्यंत त्यांच्याकडं एकसारखं आतुरतेनं पहाणं ! हीं जर खऱ्या प्रेमाचीं लक्षणं नव्हेत, तर बाई दुसरीं कोणतीं असणार ?

श्रीकृ०:—बस्स—झाली माझी खात्री ! प्रेमाच्या जाळ्यांत तीं सांपडलीं हें खास ! तरीच आमची डाळ अद्याप शिजत नाहीं ! अस्सं—अस्सं ! ठीक आहे ! कांहीं हरकत नाहीं ! पण कोकिळे !—प्रिये ! तुझं मला या कामांत सहाय्य पाहिजे !—तें मिळेल तर अकलेनं ‘ रंकाचा राव ’ कसा होतो, हें जगाच्या निदर्शनास मी आणून देईन ! पण तुझ्या साहाय्यावर माझी सगळी मदार आहे ! तुझं बिनमोल साहाय्य न मिळालं आणि या वीररायालाच त्या सटवीनं माळ घातली तर आटोपलाच बाजार ! देशांतरच करावं लागेल !

कोकि०:—पण बाई, मीं का नाहीं म्हटलं ?

श्रीकृ०:—बाबांना स्वामिद्रोहाच्या संशयावरून जन्मभर अटकेंत ठेवणाऱ्या त्या प्रतापरायाच्या कारट्याला—ह्या वीररायाला—राजपदावर आरूढ झालेला पहायचं !—राजा म्हणून वंदन करायचं ! त्यापेक्षां या केरळदेशाला—माझ्या या जन्मभूमीला—रामराम ठोकलेला काय वाईट ?—पण तें कांहीं नाहीं ! वासंतिका माझी झालीच पाहिजे.

कोकि०:—पण माझी का बाई ना आहे ? काय—काय करायचं तें गडे सांगा लवकर ! अन् न केलं तर—

श्रीकृ०:—तूं मनावर घेतल्यावर काय नाहीं करणार ? तेव्हां सध्यां इतकंच करायचं, कीं सवतीमत्सर क्षणभर बाजूला ठेवून संधी मिळाली रे मिळाली, कीं वासंतिकेजवळ माझी स्तुतिस्तोत्रें गायचीं. तसंच त्या वीररायाचा होईल तितका कमीपणा दाखवायचा. आणि हें सगळं

करायचं तें इतक्या खुबीनं कीं तिला नाहीं वाटतां कामा, कीं हें तूं शिकवणीनं करते आहेस म्हणून !

**कोकि०:**—नि इतकं करून त्यांचं मन आपल्याकडं नाहीं वळलं तर ?

**श्रीकृ०:**—नाहीं वळलं तर—नाहीं वळलं तर असं एक सैतानी जाळं पसरतों कीं, त्यांत तीं दोघंही सांपडलींच पाहिजेत ! पण त्याला तुझं साहाय्य पाहिजे !

**कोकि०:**—ऐका, चाहूल ऐकूं येते, ते पहा, सेनापति वीरराय येत आहेत ! आतां काय बाई करावं ?

**श्रीकृ०:**—तूं घाबरूं नकोस, पण तीं पहा थेट समोरच्या दिवाणखान्यांत जातो आहे ! वासंतिका जर त्याच्या प्रेमजालांत सांपडली असेल तर ती खास तिथं येईल ! माझ्याच्यानं तो प्रसंग पहावणार नाहीं ! तूं सावधगिरीनं त्या दरवाजाच्या आड लपून बैस ! आणि त्यांचं सर्व भाषण ऐक ! मी अचानक या आधुकमाधुकांच्या दूधसाखरेंत महाराजांचा मिठाचा खडा आणून टाकतों ! जा ! ( ती जाते. मिशावर पीळ देत ) वीरराय ! स्वर्ग तुला अगदीं दोन बोटं उरला आहे नाहीं का ? पण इतकं ध्यानांत ठेव, कीं अजून तुझे पाय स्वर्गाला नाहीं लागले ! ते लागण्यापूर्वींच तुझ्या पायाखालींच खणून ठेवलेल्या माझ्या कारस्थानाच्या खड्यांत तूं नाहीं पडलास, तर माझं नांवच श्रीकृष्णराय नव्हे !

[ जातो. ]



## प्रवेश चवथा.



**स्थळ**—राजमंदिर.

[ वीरराय प्रवेश करतो. ]

वीर०:—शिकारीमध्यें वाघाच्या तावडींतून वासंतिकेला मुक्त केल्या-मुळं वासंतिकेच्या आणि माझ्या प्रेमाला दृश्य स्वरूप येऊं लागलं आहे. महाराजांजवळ वासंतिकेबद्दल मागणी घालून, या गुप्त प्रेमाच्या बिकट बंदीखान्यांतून मुक्त व्हावं का ? गुप्तपणाच्या सुखदायक आर्द्र मेघाआड कोंडलेला आमच्या प्रेम-रवीचा प्रकाश, बंदीवासाच्या असह्यतेमुळं किरणाच्या रूपानं महाराजांच्या दृष्टीचा भेद करीपर्यंत थांबावा ? वासंतिकेचा हात बरा होईपर्यंत तिची नीट शुश्रूषा करायचं काम महाराजांनीं माझ्यावर सोंपवल्यामुळं वासंतिकेच्या निश्चळ प्रेमाची आयती परीक्षा झाली. वासंति-केचा हात जायबंदी झाल्यामुळं, कृत्रिम धनुष्यबाणाचा त्याग करून ईश्वर-दत्त धनुष्यबाणाचा तिनं अंगीकार केला आहे. व्याघ्रादि वन्य पशूंवर तिच्या हातून होणारी शरवृष्टि बंद पडून माझ्या हृदयाचा भेद करण्या-करितां ती कटाक्षवृष्टि करिते आहे. वासंतिकेच्या हाताची जखम जस-जशी भरत चालली आहे तसतशी माझ्या हृदयाची जखम खोल खोल घर घेत चालली आहे. ( वासंतिकेस पाहून ) आलीच ती ! ( वासं-तिका येते ) आज देवता कुणीकडे संचाराला निघाली आहे ?

वासं०:—देवतेचा संचार कुठंही होईल ! आपल्याला तर कांहीं तिच्या संचारापासून भीति नाहीं ना ? तसं जर असेल तर मी पाहीन एखादं रान, नाहीं तर कडा आणि करीन तिथं यथेच्छ संचार !

वीर०:—मग तें रान आणि तो कडा देखील पूज्य वाटून माझ्या-सारख्या भक्ताचे तिकडे डोळे लागतील. वासंतिकेच्या संचारानं रानांतल्या कांटेरी झाडांझुडपांना बहर येऊन नंदनवनाची शोभा आली, आणि काळ्या फत्तराच्या अचाट कड्यावर तिचं पाऊल पडलं म्हणजे वासंति-

केच्या कृपादर्शनाकरितां माझ्यासारखे भक्त त्या वनामध्यें तपश्चर्या करायला आणि त्या प्रेमाच्या कड्यावरून कडेलोट करून घ्यायला तयार होतील !

वासं०:—तुटलेल्या कड्यावर उभं राहणं जितकं सोपं वाटतं, तितकं तें खास नाहीं. प्रेमाच्या कड्यावर आंधळेपणानं उड्या मारतां मारतां संशयाच्या झंझावातांत प्रेमी सांपडला म्हणजे त्याचा तोल जाऊन, त्याला यातनाच्या नरकांत उडी घ्यायची बुद्धी होते. मग त्याची दृष्टि उलटी फिरून देवता डाकिणी भासते. त्याचे कर्ण बधिर होऊन प्रीतीचीं गोड गोड गाणीं त्याला प्रेतदहनाच्या धडधडण्याप्रमाणं भेसूर वाटतात. आणि विकारांच्या भोंवऱ्यांत सांपडून काडीचाही आश्रय न मिळाल्यामुळं तो मनुष्यपणापासून भ्रष्ट होऊन, कायमचा नरकवास त्याला भोगावा लागतो. वीरराय ! नको, आपण त्या कड्यावर येऊं नये. म्हणून मी आपल्याला या माझ्या हृदयांत कोंडून ठेवीन.

वीर०:—असला गोड बंदीवास कुणाला प्रिय वाटणार नाहीं ? मी तर या बंदीवासाचा अनुभव घेण्याकरितां एखादा महा भयंकर अपराध करायलाही मागं पुढं पहाणार नाहीं.

वासं०:—खरोखर मी सांगायला विसरलें.आपल्या हातून खरोखर एक अपराध घडत आहे. आणि तो घडलाच पाहिजे ! मी म्हणतें, तो अपराध कांहीं सामान्य नाहीं, पण तो आपण केलाच पाहिजे.

वीर०:—कोणचा अपराध केला पाहिजे. तुझ्यावर प्रेम करून तुझ्याशीं विवाह करायचाच ना ? अं: ! त्यांत काय आहे.

वासं०:—त्यांत कांहीं असो किंवा नसो, तें आपण मग पाहूं. पण मी म्हणतें तो अपराध अशांतला नाहीं, त्याचं स्वरूप अगदीं निराळं आहे.

वीर०:—प्रेमाच्या साम्राज्यांतले सर्व अपराध करायला मी तयार आहें, माझ्या अपराधांच्या पातकांपासून मला पावन करणारी वासंतिकेच्या प्रफुल्ल दृष्टीची गंगा माझ्या सन्निध असतांना कोणचाही अपराध मला बाधणार नाहीं.

वासं०:—आज आपल्या विचाराचे लगाम बरेच ढिले पडले आहेत ! कल्पनेचे पंख फुटून आपण हवेंत विहार करूं लागला आहांत !

काव्याच्या विविध रंगांतही डुंबू लागला आहां! मारा खोल खोल बुडी मारा, आणि आपल्या हातीं कांहीं लागतय का पहा, मारा बुडी!

वीर०:—स्त्रियांच्यां अंत:करणांत बुडी मारायची सोपी नाहीं.

वासं०:—मी कुठं म्हणतें सोपी आहे म्हणून! म्हणूनच म्हणतें, आपण विचार करून त्याच्या कांठावर यायचं होतं. आपणच अपराधाचा शोध लावायचा आव घातला नसता, म्हणजे कल्पनेच्या भोंवऱ्यांत अडकून फजित झाला नसता!

वीर०:—द्रोणचार्यांचा चक्रव्यूह इतका बिकट नसेल! कुढी—कुढी ही स्त्री जात!

वासं०:—लागला! शिव्या द्यायला लागला बरं! आतां कशावर पाळी येणार आहे सांगा बरं?

वीर०:—कशावर काय, आर्जवावर!

वासं०:—अंहः! नाहींच ओळखलं! नाहींच.

वीर०:—नाहीं! बरं आम्ही हरलों.

वासं०:—हं—याच्यावर—हे म्हणण्यावर!

वीर०:—नाहीं. अगदीं रडकुंडीला येण्यावर—पाया पडण्यावर पाळी आली! मग तर झालं?

वासं०:—मग म्हणाना तसं एकदा! म्हणाच गडे!—त्याला काय झालं? उद्यां मी राणी झालें म्हणजे आपल्याकडून तिनेदां मुजरे करून घेईन असा मीं निश्चयच केला आहे.—हं म्हणाना एकदां?

वीर०:—काय म्हणूं.

वासं०:—आपण मघाशीं म्हटलं तसं! रडकुंडीला येण्यावर! आणि पुढचं म्हणा गडे!—

वीर०:—थट्टा किती करतेस?

वासं०:—खरंच थट्टा नाहीं करीत. म्हटलंत तर काय होतं? हो पण मी विसरलेंच. तुम्ही पुरुष! पुरुषानं स्त्रीपुढं कमीपणा घेणं म्हणजे काय, तुमचे कायदे निराळे, आमचे निराळे! पुरुष महाराज, ही वासंतिका आपली महान् अपराधी आहे. आपण कोणचा अपराध करतां

आहांत हें सांगतांनाच आपण कोण, काय, याचं भान न राहून तिच्या हातून आपलाच खरोखर अपराध झाला आहे. क्षमा करावी !

वीर०:—लागलीस का जास्त थट्टा करायला ! मी जरी पुरुष आहें, तरी वासंतिकेचा दास आहें. माझ्या प्रेमाच्या राणीला सलामी देऊन तिच्या पुढं लीन होण्यांत मला आनंदच आहे. मी आतां महाराजांजवळ तुझ्याबद्दल मागणी घालून, माझं तुझ्या वरचं प्रेम उघड करितों.

वासं०:—अंहः इतक्यांत नको गडे ! असं काय करायचं ? नको इतक्यांत ! ही गोष्ट अशीच कांहीं काळ गुप्त असूं द्या. हाच अपराध आपण करा. म्हणून मी आपल्याला सांगणार होतें. बाबांना आपल्या प्रेमाचा एवढ्यांत मागमूसही देऊं नका. मी सांगेपर्यंत त्यांच्यापाशीं याबद्दल चकार शब्दही काढायचा नाहीं हं ! माझी शपथ आहे आपल्याला. वीरराय ! ही शपथ आपण पाळता आहां, एवढाच शूरपणा, एवढाच पराक्रम मला दाखवा.

वीर०:—तुझी शपथ मला मान्य आहे. पण अशी शपथ मला घालण्यांत तुझा हेतु तरी काय, तो तर कळूं दे ?

वासं०:—माझा कांहीं हेतु नाहीं, आपलं माझं प्रेम आपल्या दोघांनाच माहीत आहे. आपल्या प्रेमाच्या राज्यांत आपण दोघंच अहोंत. आपल्या प्रेमाचा विषय आपणां दोघांमध्येंच भरला आहे. आपल्या प्रेमाचं विश्व आपण दोघंच आहोंत, आपल्या प्रेमाचे परमेश्वर आपण दोघंच आहों. या सुखमय प्रणयाच्या माझ्या हृदयाला गुदगुल्या करणाऱ्या गोड गोड कल्पना मला ब्रह्मानंदांत बुडवून टाकतात. सारी सृष्टि शून्य होते, जमीन अदृश्य होते, आकाश नष्ट होतं, आपण आणि मी याशिवाय स्वतःची स्वतःला जाणीव देणारी एकही गोष्ट मनाला जागं करीत नाहीं. अहाहा ! तो आनंद—तें सुख सदोदित मिळावं असं कोणाला वाटणार नाहीं ! सदोदित राहो, पण कांहीं काळ तरी या सुखसमाधींतून मला जागी करूं नका !

वीर०:—वेडीच आहेस ! मी तुझी समजूत करितों.

वासं०:—मी वेडीना ? मग वेड्यांची समजूत कशी करणार आपण ?

पण ते पहा बाबाच्च आले. ( हरदेवराय येतो. ) बाबा, माझा हात आतां बरा झाला. मी उद्यां पुन्हां शिकारीला जाणार !

हर०:—बाळे, यापुढं तूं पुन्हां मृगयेला जायचं नाहीं. तुझ्या हाताची जखम बुजाली असेल; पण त्या भयंकर प्रसंगाची माझी आठवण कांहीं अजून बुजत नाहीं. हे वीरराय जवळ नसते तर त्या चवताळलेल्या वाघानं तुझी काय दशा केली असती ?

वीर०:—महाराज, हा सारा आपल्या पायाचा पुण्यप्रताप आहे. त्यांनींच त्या वाघाला अर्धमेला केला होता. मी निमित्तमात्र झालों.

हर०:—वीरराय ! त्या वाघाहूनही भयंकर अशा शत्रूशीं झुंझायला आपल्याला आतां सज्ज झालं पाहिजे.

वीर०:—केरळ देशचे वीर शत्रूशीं झुंझायला केव्हांही सज्जच आहेत, या दासाला समर म्हणजे ब्रह्मानंद वाटत असतो, महाराजांना ठाऊकच आहे.

हर०:—यांत काय संशय ? हें पत्र पहा. ( पत्र देतो. ) मावळ—देशचे राजे माधवदेव यांनीं वासंतिकेबद्दल केलेली मागणी आम्हीं नाकारली, हा अपमान सहन न होऊन, वासंतिकेला बलात्कारानं आपलीशीं करण्याकरितां तो आमच्यावर चालून येत आहे.

वासं०:—जगदंबे, तूंच आमची पाठीराखी आहेस ! माझ्यामुळं बाबांना या वयांत हा युद्धाचा ताप व्हावा त्यापेक्षां मी झालेंच्च नसतें तर काय वाईट ? शिवाय, माझ्यामुळं हें युद्धाचं संकट केरळ देशावर ओढवलं, असं प्रजा दूषण देणार तें निराळंच.

हर०:—बाळे, राज्यांतल्या एखाद्या भंणगावरही बलात्कार होत असेल तर त्याचा प्रतिकार करणं माझं कर्तव्य आहे. मग प्रत्यक्ष तुझ्यावर-या राज्याच्या भावी राणीवर होऊं पहाणाऱ्या बलात्काराचा विरोध करणं हें माझं केवळ पवित्र कर्तव्य आहे बरं ! आपण होऊन हा माधवदेव इथं आला, चार दिवस राहिला, आमचा पाहुणचार घेतला, तुझ्यासंबंधानं त्याला आशा लागेल, असं आमच्या मुखांतून एक अवाक्षरही गेललं नाहीं. असं असतां आपल्या राज्यांत जातांच तुझ्याबद्दल मागणी करतो काय ?

ती नाकारतांच धमकावणीच्या गोष्टी सांगतो काय ? आणि वरती आम-च्यावर चालून यायची तयारी करतो काय ?

वीर०:—( पत्र वाचून होतांच दांतओठ चावून ) खुशाल चालून ये म्हणावं ! केरळ–देशांतल्या वीरांनीं हातांत कांकणं नाहीं भरलीं ! असेल शक्ति तर प्रतिकार करूं ! मग प्राण गेला तरी हरकत नाहीं. वीर-रायच्या खड्गाचं खेळणं नाहीं झालं अद्याप !

हर०:—शाबास ! श्रीगोकर्णेश्वराच्या कृपेनं केरळ-देशावर शौर्याची अवकृपा झाली नाहीं ! आमचे सेनापति वीरराय जोंपर्यंत कचरले नाहींत, आमच्या श्रीकृष्णरायासारखे राज्याचे खांब जोंपर्यंत हालले नाहींत, तोंपर्यंत आम्हाला भ्यायचं कारणच नाहीं.

वीर०:—या अलौकिक रत्नाकरितां प्रत्यक्ष कृतांतकाळाशीं झुंझायला कोण डरेल ?

हर०:—वासंतिकेच्या भाग्यवान् वराची आम्हीं केलेली योजना आतां जाहीर करणं जरूर आहे. आमचे शूर भाचे श्रीकृष्णराय यांना तिनं वरावं असं आम्हीं निश्चित केलं आहे.

वासं०:—कुणाला ? श्रीकृष्णरायाला ?

हर०:—होय बाळे ! श्रीकृष्णरायाची योग्यता तशीच आहे. पण त्याचं नांव तुला इतकं वाईट कां लागलं ?

वासं०:—बाबा ! मी यावर बोलूं तरी काय ?

हर०:—बरं, याबद्दल मगच आपण बोलूं. वीरराय ! येणाऱ्या पर-चक्राचं कसं निवारण करावं हें आपल्याला ठरवलं पाहिजे. ( वीररायाला एकीकडे नेऊन ) श्रीकृष्णरायाचं नांव काढतांच वासंतिकेचं मन अस्वस्थ झालं आहे. तिला चार समजुतीच्या गोष्टी सांगितल्या पाहिजेत. शिकारीपासून तुमच्यावर तिचा अतिशय विश्वास बसला आहे. मी कांहीं बोललों तरी तिला तें आतां कडूच लागणार. वीरराय ! तुमचा शब्द ती खास मोड-णार नाहीं. तुम्हीच तिचं मन शांत करा. आणि आपल्या पुढल्या विचारा-साठीं खलबतखान्यांत निघून या.

[ हरदेव जातो. ]

वीर०:—वासंतिके ! काय झालं हें ! गुप्त प्रेमाच्या ब्रह्मानंदासाठीं तूं घेतलेली समाधि अशा रीतीनं भंग व्हावी ना, माधवदेवाच्या मागणी-मुळं तुझ्या सुखसमाधीवर आलेलं संकट मीं तरवारीच्या धारेवर उडवून दिलं असतं, पण महाराजांच्या अकल्पित योजननं केलेल्या तुझ्या समाधीभंगाचा प्रतिकार मी कसा करणार ! वासंतिके, मीं तुझ्याबद्दल या पूर्वीच मागणी घातली असती तर आज आपल्यावर हा प्रसंग आला नसता !

वासं०:—पण मला काय ठाऊक, कीं माझे अगदीं क्षुल्लक गोष्टींत देखील कोड पुरविणारे बाबा माझी जन्माची गांठ बांधतांना मात्र माझ्या आवडीनावडीचा विचारसुद्धां करायचा मनांत आणणार नाहींत ?

वीर०:—वासंतिके ! तुझ्यासारखं अलभ्य रत्न मला लाभेल, ही आशाच मीं आधीं लावून घेतला नसती तर किती बरं झालं असतं ! पण त्याला मी तरी काय करूं ! खऱ्या प्रेमाला अलभ्य, अशक्य असं काय वाटत असतं ?

वासं०:—त्या चांडाळाची बटीक होऊन राहण्यापेक्षां जन्मभर अवि-वाहित राहून जुलमाच्या लग्नाच्या वेळीं स्त्रियांनीं काय करावं, याचा धडा मी साऱ्या स्त्रीवर्गाला घालून देईन.

वीर०:—ती पहा ! तीच स्वारी एखाद्या विजयी वीराप्रमाणं मोठ्या दिमाखानं इकडे येत आहे. मुखश्रीवर आनंद आणि अभिमान झळकत आहे.

वासं०:—माझं दैवच फिरलं !

[ श्रीकृष्णराय येतो. ]

श्रीकृ०:—ताईमहाराज ! महाराजांच्या आज्ञेनं मी आपल्याकडे आलों आहें. माधवदेव युद्धाची तयारी करून केरळ-देशावर कशाकरितां चालून येत आहेत हें आपल्याला—

वासं०:—ठाऊक आहे मला तें ! पुढं ?

श्रीकृ०:—आपण कुमारी आहांत, म्हणूनच त्याला मागणी कर-ण्यास आणि ती नाकारली असतां चालून येण्यास कारण मिळालं; तें दूर करावं या हेतूनं आपल्या वराची योजना करून विवाहाचा मंगलविधिही

उरकून घ्यावा, असा महाराजांचा विचार झाला आहे ! आणि महाराजांनीं कृपाळु होऊन मलाच आपण—

वासं०:—आलं माझ्या लक्षांत ! पण या वेळेस त्याबद्दल मी कांहींच बोलूं इच्छित नाहीं ! माधवदेवाच्या मागणीच्या वेळीं बाबांनीं जसं माझ्या मर्जीवर सोपविलं, तसं आतांही सोपवतील अशी खात्री आहे.

श्रीकृ०:—हेंच उत्तर सांगूं महाराजांना ?

वासं०:—आपण नकोत श्रम घ्यायला. मीच काय तें सांगतें ! तुम्हाला श्रम नकोत ! ( वीररायास ) आपले उपकार मी जन्मभर विसरायची नाहीं. [ जाते. ]

श्रीकृ०:—ही स्त्रीजात म्हणजे देवानं पुरुषापुढं एक कोडंच करून ठेवलं आहे ! ह्या गोड बोलतील, तेव्हां यांच्या मनांत कडू कपट भरलं आहे, असं समजावं ! कपाळाला आठ्या घालतील तेव्हां या प्रसन्न आहेत असं समजावं ! आणि अश्रु गाळतील तेव्हां आनंदाची उकळी आहे असं समजावं ! आणि या किंवा अशाच तऱ्हेनं यांच्या कृतींचा अर्थ केल्यावांचून हें महागूढ उकलणंच शक्य नाहीं. ज्यांचा ह्यांना तिटकारा त्यांना ह्या गोंजारतील आणि ज्यांच्यावर यांचं प्रेम त्यांना या भंडावून सोडतील !

वीर०:—स्त्री जातीची अशी निष्कारण निंदा करणं म्हणजे स्वतःच्या मनाचा नीचपणा दाखविणं आहे ! वासंतिकेच्या अंगच्या सुगंधानं इथली हवा दरवळलेली नसती, तर तुमची ही घाण असह्य होती !

श्रीकृ०:—बाह्यांगाच्या सुगंधानंच वीरराय तुम्ही गुंगायचे, तुम्हाला आंतल्या दुर्गंधीची कल्पना कशी व्हावी ?

वीर०:—काय बोलतां हें ? तिच्याइतकं निर्मळ अंतरंग गंगेचं तरी असेल का ? निष्कपट मन, कोमल अंतःकरण आणि निष्कलंक आचरण हीं जर श्रीकृष्णराय तुमच्या मतं घाण असेल तर बोलणंच खुंटलं ! पण खरं बोलायचं तर ती प्रत्यक्ष पावित्र्याची मूर्ति आहे ! आपल्या सारख्यांनीं तिच्यापुढं लोटांगणं घालावीं अशी तिची योग्यता आहे !

श्रीकृ०:—( स्वगत ) ठीक ! ठीक रंगांत येतो आहे. ( उघड ) देवानं तिला सौंदर्य दिलं आहे, हें मात्र खरं ! पण हे पावित्र्यादि सद्गुण

या केरळ-देशांतच नाहींत, तर तिच्याजवळ कुठून असणार ? अन्य स्थळीं, अन्य काळीं आढळणाऱ्या ह्या वस्तु केवळ सुंदरांत तुम्हाला शोधूनही मिळायच्या नाहींत !

वीर०:—बस्स करा तुमची ही थट्टा !

श्रीकृ०:—तुमची थट्टा मी कशाला करूं हो. खरी खरी वस्तुस्थिति आढळली तशी सांगतों आहें ! वासंतिकेची प्रेमाराधना तर नाहीं करीत ? हो ! त्यावांचून माझी स्पष्टोक्ति तुम्हांला इतकी कडू वाटती ना ?

वीर०:—असल्या सद्गुणी मूर्तीची आराधना कोण नाहीं करणार ? असल्या स्वर्गसुखासाठीं कोण नाहीं धडपडणार ?

श्रीकृ०:—हे पहा ! वीरराय, स्वर्गांत जागेला तोटा नाहीं, जितके जातील तितक्यांचा तिथं समावेश होईल ! पण, वासंतिकेच्या हृदयांत मात्र फक्त एकाचीच जागा आहे ! तेव्हां तिचा नाद सोडून, दुसऱ्या एखाद्या आघल्याला साजेशा—सुंदरीच्या आराधनेला लागाल तर यांत तुम्हांला यश तरी येईल. इथं यश मिळणंच अशक्य आहे !

वीर०:—या वीररायाला आणि यश मिळणं अशक्य ! जगांत अशक्य—अशक्य असं काय आहे ? उकिर्ड्यावरच्या कोंबड्याला मात्र गरुडाचं अंतराळांतलं तळपणं अशक्य वाटणार ! पण ज्याच्याजवळ निश्चय आणि साहस हीं आहेत त्याला अशक्य काय आहे ? तीं असल्यावर कालावधीनं तरी यश कां येऊं नये ? युद्धांतही जयश्री कोणाला माळ घालते ? ज्याजवळ निश्चय आणि साहस हे दोन गुण आहेत त्यालाच ना ? मग या प्रणययुद्धांत सुद्धां, ज्याजवळ ते आहेत त्यालाच ती माळ घालणार ?

श्रीकृ०:—सेनापति, तुमचं मला हंसूं येतं ! तुम्हाला मी आपलं स्नेहाच्या नात्यानं सांगून ठेवितों कीं, तुमच्यावर तिचं प्रेम काडीभरही नाहीं, मग यश येणार कसं ?

वीर०:—तुमची घाण इतका वेळ सहन केली, पण आतां मात्र असह्य झाली आहे ! माझ्यावर तिचं प्रेम आहे कीं नाहीं, हें पहायला तुम्हाला सांगितलं होतं का कधीं ? मग या लष्करच्या भाकऱ्या भाजतां

कशाला, आणि प्रतिष्ठितपणाचा आव आणून दुसऱ्या एखादीची आराधना करायला-मला या वीररायाला-सांगतां ? लाज नाहीं वाटत ?

**श्रीकृ०:**—प्रेमानं वेड लागतं म्हणतात; त्याचा मासला आज मला पहायला मिळाला ! या वेडाचीं लक्षणं—म्हणजे—पोकळ ऐट, वृथाभिमान, आणि मनोराज्य ! वीरराय तुमच्या वेडांत हीं तीन्हीं लक्षणं मला स्पष्ट दिसत आहेत ! तुम्ही शुद्धींत आहात का ? तुमचा इकडे प्रेमानं जीव जातो आहे ! पण तिला आहे का कांहीं त्याचं ? आणि तेंही उघडच आहे हो ! तिचं तुमच्या ठिकाणीं प्रेमच जर नाहीं, तर फुकट आहे तुमचं प्रेमानं वेडं होणं ! आणि इतकं असूनही तिचाच नाद धरतां याला म्हणावं तरी काय ?

**वीर०:**—वासंतिका आपल्या अनुपम सौंदर्यानं माझी प्राणेश्वरी झालेली नसती, तिच्याबद्दलच्या प्रेमाची ज्योत माझ्या अंत:करणांत पेटलेली नसती, तरी तुमच्या दरडावणीला मी भीक घालींत नाहीं हें दाखविण्याकरितांच यापुढं तिच्या प्राप्तीचा प्रयत्न करायला मीं कमी केलं नसतं ! ती अगदीं काळी, कुरूप, अष्टवक्रा जरी असती तरी देखील या तुमच्या उद्दाम-पणाबद्दल तिरस्कार दाखविण्याकरितां यापुढं वेडा होऊन तिच्या नांवाचा जप करायला कमी केलं नसतं !

**श्रीकृ०:**—तुमची ही प्रौढी हाणून पाडणं तुम्ही भाग पाडतां, तेव्हां तुम्हाला सांगतोंच ! ही पोर कितीशी निर्मळ आहे, हें एक मी जाणून आहें, आणि ती जाणून आहे ! आतां तिनं मला वरावं, असं आपलं महाराजांनीं ठरवलं आहे; पण ती जरी माझ्या पायांवर अगदीं लोटांगणं घालीत माझ्याकडे चालून आली, तरी मी आपली धर्मपत्नी म्हणून तिचा अंगीकार करीन कीं नाहीं, हें माझ्या मनाला ठाऊक ! मात्र तुम्हांला एवढं सांगून ठेवतों कीं, तुमच्यावर तिचं प्रेम आहे, असं जें ती दाख-विते, तें सगळं ढोंग आहे ! असल्या भ्रष्ट पोरीला मी फार तर आपली नाटकशाळा करीन, माझी अर्धांगी होण्याइतकी कांहीं ती निर्मळ नाहीं ! असल्या उनाड मैनेला—

**वीर०:**—( तरवारीला हात घालून ) या राजमहालांत आहांत म्हणू

नच गय करतों आहें ! शहाणे असाल तर सिंहाला अधिक चवताळ-ण्याच्या भरीस पडूं नका !

श्रीकृ०:—( हंसून ) हं-हं-सेनापति ! तुम्ही तर अगदीं युद्धालाच सिद्ध झालांत ! मी हें सगळं खोटंच पिकवतों, तिच्यावर लटकच कुंभांड रचतों, आणि तुम्हांला चवताळवितों असं कां वाटतं तुम्हांला ? मला काय तुम्ही इतका अधम समजतां, इतक्या दिवसांच्या स्नेहाचा हाच का अनुभव ?

वीर०:—महा अधम, महाचांडाळावांचून तिच्या शीलाविरुद्ध ब्र काढायची कोणाची छाती होईल ?

श्रीकृ०:—हेंच तुमचं ठाम मत ?

वीर०:—प्राण गेला तरी बोललों तें बदलायचा नाहीं.

श्रीकृ०:—प्राण द्यायला तयार होता, तर माझी का ना आहे ? तर मग आज रात्रींच, असा चंद्र मध्यावर आला कीं, वासंतिकेच्या महाला-जवळील आंबराईत सशस्त्र या. वासंतिका भ्रष्ट आहे किंवा कसं, हें तेथं एक तर सप्रमाण-पुराव्यानिशीं-सिद्ध करतों, नाहीं तर शस्त्रांनीं तरी या गोष्टीचा कायम निकाल लावूं !

वीर०:—ठीक ! मी या गोष्टीला कबूल आहें ! पण तुमचं खड्ग आणायला तुम्हीही विसरूं नका ! तसंच सगळी निरवानिरव करून ठेवा ! आपण दोघंही तुटलेल्या कड्यावर उभे आहोंत. दोघांचा किंवा दोघांपैकीं एकाचा तरी—कपाळमोक्ष आज होणार हें ठरलेलंच आहे.

[ वीरराय जातो. ]

श्रीकृ०:—हें ठीक जुळलं ! संधी पण सोळा आणे आली आहे ! ती जर यां दवडली, तर माझ्यासारखा महामूर्ख मीच ! झटपट तयारीला लागावं ! या पोरीनं मला वरावं, असं जरी महाराजांनीं ठरवलं आहे, तरी ती कांहीं वळायची नाहीं ! तेव्हां हाच डाव उडवून द्यावा ! एक तर या राजपदाच्या आणि माझ्या आड आलेली ही पोर व्यभिचारीणी ठरून बाजूला सरेल आणि राजपदाचा मार्ग खुला होईल ! किंवा राज-

द्रोहाच्या संशयावरून माझ्या बाबांना जन्मभर कारागृहांत ठेवणाऱ्या त्या प्रतापरायाचा सूड या त्याच्या पोराला वीररायाला माझ्या राक्षसी जाळ्यांत अडकवून खासा उगवून घेतां येईल! पण या कार्यांत अहो, असुरी देवतांनो, तुमचं मला सहाय्य झालं पाहिजे! आणि तुम्हीं शिकवलेल्या या कृष्णमंत्राची भारणी करण्याचं मला सामर्थ्य देऊन, त्या मंत्राचा प्रभावही तुम्हींच दाखविला पाहिजे.

[ जातो. ]



# अंक दुसरा.

—— ❋०❋ ——

## प्रवेश पहिला.

स्थळ—राजवाड्यांतील एक उपशाळा.

[ रुद्राक्षराय प्रवेश करतो. ]

रुद्रा०:—श्रीकृष्णरायांकडून इतक्या निकडीचं बोलावणं आलं, तें जर चंडिकेच्या मुखांतून आलं नसतं तर मी आलोंच नसतों. खरोखर, या बायकांपुढं हातच टेकावे लागतात बुवा ! अबला म्हणवितात, पण या रुद्राक्षरायासारख्या प्रबलालाही चीत करितात ! बाकी दिलंच आहे देवानं तसं मोहिनीसामर्थ्य त्यांना ! वाटतं कीं सगळ्या रमणी जातीचा एकदम एकच साखरचुंबा घ्यावा ! इतकी ही स्त्रीजात मोहक आहे ! ( दूरवर चमेली दासी दिसते ) उदाहरणार्थ—ही कोणी दासी इकडे येत आहे, ही सगळ्यांना आपले दासानुदास करील, इतकी जादू भरली आहे हिच्या चालण्यांत ! चला एक रंगी तालीम करूं !

[ चमेली प्रवेश करिते. ]

चमे०:—( रुद्राक्षरायास निरखून पाहून ) कोण—कोण हवं तुम्हाला ?

रुद्रा०:—मनरमणी ! तुजवांचून मला दुसरं कोण हवं असणार ?

चमे०:—अगबाई !

रुद्रा०:—माझ्या आकांक्षांची फलश्रुति तूं ! माझ्या जिवाची स्वामिनी तूं !

चमे०:—बाई कोण हा ?

रुद्रा०:—माझा पुरुषार्थ तूं !

चमे०:—म्हणजे ?

रुद्रा०:—माझा पराक्रम तूं ! माझं शौर्य तूं !

चमे०:—अगबाई !

रुद्रा०:—( हात जोडून गुडघे टेंकून ) माझी धर्मभक्ति तूं ! माझी देशभक्ति तूं !

चमे०:—हो का ? इतकी का मी मोठी आहे ?

रुद्रा०:—महाभारताहूनही तूं मोठी ! महासागराहूनही तूं विशाळ !

चमे०:—मला नव्हतं बाई ठाऊक हें !

रुद्रा०:—तुझ्याइतकी सुंदर तूंच !

चमे०:—बाई मी सुंदरही आहें, नाहीं ?

रुद्रा०:—रंभा उर्वशी आदि अप्सरांहूनही तूं सुंदर ! पारिजातकाहूनही तूं सुकुमार ! मोहिनीहूनही तूं मोहक !

चमे०:—बाई बाई ! हद्द झाली माझी ! आतां जीव वांचवावा तरी कसा ?

रुद्रा०:—तुझ्या रूपगुणसंपदेला सीमाच नाहीं ! ( डोळे मिटून ) वाटतं कीं हें असे बाहू पसरावे आणि तुला अशी !—( बाहु पसरून चमेलीस आलिंगन देण्यास जातो. व चमेली झटकन् निघून जाते. ) ( रुद्राक्षराय डोळे उघडून ) काय ? गेली ! हर ! हर ! ( दूरवर जाई दासी दिसते तीस पाहून ) ही दुसरी ! ही तर तिच्याहूनही मोहक ! ( जाई प्रवेश करते. ) माझ्या आकांक्षाची फलश्रुति तूं ! माझ्या जीविताची स्वामिनी तूं !

जाई:—( स्वगत ) हा कोण तरी बाई ?

रुद्रा०:—माझा पुरुषार्थ तूं ! माझा पराक्रम तूं ! माझं शौर्य तूं !

जाई:—अगबाई ! इतकी का मी शून्य आहें ?

रुद्रा०:—( गुडघे टेंकून व हात जोडून ) माझी देशभक्ति तूं ! माझी धर्मभक्ति तूं !

जाई:—बाई ! मी इतकी का पोंकळ आहें ?

रुद्रा०:—माझं कर्तृत्व तूं ! माझं वक्तृत्व तूं ! माझं कवित्व तूं !

जाई:—काय इतकी मी निरस आहे ?

रुद्रा०:—अमृताहूनही तूं सुरस आहेस! पारिजातकाहूनही तूं सुकुमार! तुझ्याइतकी नाजूक तूंच! तुझ्याइतकी सुंदर तूंच!

जाई:—काय ? मी सुंदर ?

रुद्रा०:—रंभा उर्वशी आदि अप्सरांहूनही तूं सुंदर!

जाई:—बाई—बाई—धन्य मी!

रुद्रा०:—माझं धनवैभव तूं! माझी प्रीति तूं! माझी कीर्ति तूं!

जाई:—माझी तहान तूं! माझी भूक तूं!

रुद्रा०:—( पुढें होऊन ) तुझ्या अधरामृताचा एकच घोट मिळेल तर स्वर्ग हाच!

जाई:—( मागें सरून ) पाताळ हाच! मृत्यु हाच!

रुद्रा०:—चुंबनांत कसलं बरं पातक ? आई नाहीं का आपल्या अर्भकाचं चुंबन घेत ?

जाई:—मग बाई मी तुमची आई ? कीं अर्भक ?

रुद्रा०:—पति नाहीं का आपल्या पत्नीचं चुंबन घेत ?

जाई:—मग मी आपला पति का पत्नी ?

रुद्रा०:—( डोळे मिटून ) वाटतं, कीं अस्से बाहू पसरावेत, नी अश्शी ( बाहु पसरून पुढें होतो. झटकन् निघून जाते. समोरून कोकिळा येते. रुद्राक्षरायाच्या बाहूंत सांपडते. )

कोकि०:—धांवा. हो धांवा! अग बाई! [मुसकटांत देते. ]

रुद्रा०:—( कोकिळेला पाहून ) अरे बापरे! कोण ? कोकिळाबाई ? माफ करा! मला काय ठाऊक तुम्हीशा ?

कोकि०:—रुद्राक्षराय ? झालं ते झालं! क्षमा करतें तुम्हाला! पण ती एका अटीवर! तिकडे श्रीकृष्णरायांना त्यांच्या कार्यांत कसूर न करितां साहाय्य करायचं मला वचन दिलं तर! त्याकरितां तर आज तुम्हाला मुद्दाम बोलावणं पाठविलं होतं!

रुद्रा०:—हें घ्या वचन! पण मला क्षमा करा!

कोकि०:—क्षमा केलीच आहे! पण श्रीकृष्णरायांना मनोभावानं सहाय्य करायला हवं बरं ?

रुद्रा०:—तयार आहें मी ! कुठं आहेत ते या वेळीं !

कोकि०:—आतां जरा गडबडींत आहेत ! मग या केव्हां तरी मुद्दाम—

रुद्रा०:—ठीक ! जातों तर आतां मी !

कोकि०:—जा. पण त्यांना भेटायला नि ते मागतील ती मदत करायला चुकूं नका बरं !

रुद्रा०:—नाहीं नाहीं मी चुकत !

कोकि०:—नाहीं तर आतांचा हा सारा प्रकार त्यांच्या कानीं घालायला चुकायची नाहीं !

रुद्रा०:—माफ करा ! कोकिळाबाई ! तेवढं मात्र करूं नका ! मी आपलाच बंदा आहें !

कोकि०:—बरं तर या आतां !

[ जातात. ]



## प्रवेश दुसरा.



**स्थळ**—वासंतिकेचा महाल.

[ वासंतिका प्रवेश करते. ]

वासं०:—( स्वगत ) खरोखर हे विकार नसते, तर किती बरं झालं असतं ? पण ते व्हावं कसं ? आनंद आणि प्रेम हे जसे मनाचे धर्म आहेत, तसे भय—तिरस्कार हेही त्याचेच धर्म नव्हेत का ? घालीन तर माझ्या जिवाचे जिवलग वीरराय यांनाच माळ घालीन, या विचारानं इकडे मी ब्रह्मानंद अनुभवितें आहें, तों बाबांचा श्रीकृष्णरायाबद्दलचा निश्चय मनांत दत्त म्हणून उभा राहून मला नुसतं कांपरं भरवितो ! इकडे प्रेम मला सुखाच्या शिखरावर नेऊन बसवितं, तर तिकडे तिरस्कार वेद-

नांच्या महादरींत मला लोटून देतो ! आनंद, भय, प्रेम, तिरस्कार अशा परस्पर विरोधी विकारांच्या तडाक्यांत सांपडल्यानं, मी वेडी तर नाहीं ना होणार ?–पण बाबा आलेच ! माझ्या दैवाची आतां परीक्षा आहे !

[ हरदेवराय येतो. ]

हर०:—बाळे, श्रीकृष्णरायाचं नांव मात्र काढलं, तों तूं तोंड काय फिरवलंस, आणि गोरीमोरी काय झालीस ! तें बोलणं त्यामुळं तितकंच ठेवावं लागलं !

वासं०:—बाबा, मला तेव्हां जें कांहीं वाटलं तें सांगतांही येईना आणि दाबतांही येईना, त्याला मी काय करूं ? मनाला तर कांटे बोचत आहेत ! पण त्यांच्या वेदना तर बाहेर दिसूं नयेत, हें बाई कसं होणार ?

हर०:—बाळे ! तुला दुःख व्हावं, असं मी जाणूनबुजून कांहीं करीन, असं वाटतं तुला ? तुझ्यापरतं या इहलोकीं मला काय बरं आहे ?

वासं०:—हें का मला सांगायला पाहिजे बाबा ?

हर०:—आणि म्हणूनच, मीं केलेली तुझ्याविषयींची योजना तुझ्या मनाच्या उलट झाली असली, तरी मी ती केवळ अधिकाराच्या जोरावर तुला पसंत करायला लावीन असं होईल ?

वासं०:—तुम्हीं मला जन्मच दिला आहे ! तेव्हां असं कसं कराल ! पण लग्नाच्या बाबतींत ज्याचं हित त्यालाच जसं कळेल, तसं सर्वज्ञ पित्यालाही कळायचं नाहीं, आणि म्हणूनच ज्याला त्याला आपल्या आवडीप्रमाणं निवड करण्याची मोकळीक वडील माणसांनीं ठेवायला नको का ? आपल्यांत पूर्वीं स्वयंवराची चाल होती, ती याच करितां नाहीं का ?

हर०:—तुझं म्हणणं खोटं कोण म्हणेल ? पण विचार कर ! हा श्रीकृष्णराय, एक तर माझा भाचा, तुझ्या अभावीं या अवघ्या राज्याचा तो वारस ! शिवाय, शौर्यादि गुणांनीं तो जरी आपल्या सेनापतीसारखा अगदीं असामान्य नसला, तरी अगदीं सामान्य नव्हे ! तेव्हां आम्हीं त्याला आपला जांवई करावा, असं वाटण्याचा त्याला अधिकार आहे ! आणि माझा जांवई म्हणजे माझ्या मागं या केरळदेशचा राजा ! तेव्हां

या गोष्टीचा विचार केला, म्हणजे श्रीकृष्णरायानंच तुला वरावं असं मीं ठरविलं आहे, त्यांत वावगं तें काय झालं? आतां तुझ्यावरील आपलं प्रेम त्याला तुझ्याजवळ बोलून दाखवायचं धाडस होत नाहीं, यांत त्याचा काय दोष? उलट हा त्याचा विनय होय!

वासं०:—तें एक देवालाच ठाऊक! पण माझं मन मात्र त्याच्याकडे वहात नाहीं, त्याला बाबा मी काय करूं? आणि इतकंही असून तुमचा हेकाच असला, तर माझं दैवच फिरलं म्हणायचं! देवानं मला सुखाचे दिवस दाखवायचे नाहींत असंच ठरवलं आहे असं मी म्हणेन!

हर०:—बाळे! तुला सुखं मिळावं एवढ्याकरितां तर आमची ही योजना! आणि—

वासं०:—पण बाबा, या योजनेनं मला सुख मिळायचं लांबच राहिलं, दु:ख मात्र जन्मभर चुकायचं नाहीं! मी इतक्या धिटाईनं बोलतें, हें पाहून ही कारटी झालीच नसती किंवा लहानपणींच मेली असती तर बरं होतं, असंही म्हणाल! पण मी तरी कुणाजवळ आपलं मन मोकळ करूं? आई असती तर तिच्याशीं मात्र सगळ काय तें सांगतां आलं असतं! पण दुर्दैवानं मी तिला लहानपणींच मुकलें, आतां बाबा तुम्हांवांचून मी हें कोणाजवळ सांगूं?

हर०:—पण त्याच्याकडे तुझं मन न वहायला झालं काय?

वासं०:—एखाद्याकडे मन वाहणं न वाहणं, हें कां बाबा आपल्या हातचं आहे?

हर०:—असं बघ, आम्ही म्हणजे आतां पिकलेल्या पानासारखे! केव्हां गळूं याचा कांहीं नियम नाहीं. तेव्हां डोळे मिटण्यापूर्वीं तुला तुझ्या पतीच्या सावलीखालीं पाहिली म्हणजे आमचं इतिकर्तव्य झालं! पण बाळे, या श्रीकृष्णरायाला न वरतां तुझं मन ज्याकडे वहात असेल अशा एखाद्या वीराला तूं वरलंस, तर हा श्रीकृष्णराय म्हणजे कांहीं सामान्य व्यक्ति नव्हे! नाना युक्तिप्रयुक्तींनं तो तुम्हाला वैताग आणील! आजही अर्धी अधिक प्रजा त्याला खराखुरा युवराज समजते आहे! अशा स्थितींत केरळदेशाच्या राज्यपदावर तुझ्या शेजारीं त्याच्या ऐवजीं दुसरा कोणी

बसलेला या प्रजेला पहावेल ? बंडाळी उत्पन्न करून तुझ्या प्रजेंत आणि तुझ्यामध्यें कलह माजवायला हा श्रीकृष्णराय कमी करील ? मग या राज्याची गति काय होईल ?

वासं०:—पण बाबा, हे सगळे तर्कच ना ? शिवाय राज्यांत कलह माजेल, या काल्पनिक भीतीनं, ज्याकडे कांहीं केल्या माझं मन वहात नाहीं, त्याला माळ घालून मी जन्माची दु:खी होऊं ? ज्यांचीं मनं प्रेमानं बांधलेलीं नाहींत, त्यांना तुम्हीं लग्नविधीनं जखडलींत तर त्यांना सुख होईल का ? नसलेलं प्रेम उत्पन्न करण्याचं सामर्थ्य लग्नविधींत आहे का ? बाबा ! राज्यप्राप्तीपेक्षां प्रेमाची महती मला जास्त वाटते. श्रीकृष्णरायाला माझ्यापेक्षां राज्यच प्रिय आहे ! राज्यसुखाच्या क्षणिक आनंदापेक्षां प्रेमाचा चिरकालीन आनंद मला प्रीयच वाटणार ? बाबा ! श्रीकृष्णरायाला खुशाल तें राज्य देऊन टाका ! पण काल्पनिक भीतीनं गांगरून जाऊन, त्या भीतीनं बुजगावणं मला दाखवून माझ्या प्रेमाच्या राज्यावर संकट आणूं नका !

हर०:—बोलणंच आटपलं ! बापानं लेकीची विनवणी किती करायची ? बस्स !

वासं०:—पण बाबा !

हर०:—अधिक नको ! उद्यां त्या माधवदेवाच्या धमकावणीचा विचार करण्याकरितां राजमंडळाची सभा आहे, तूं मघाशीं म्हटलंस त्याप्रमाणं खरोखरच सगळी प्रजा आणि राजमंडळ ह्या भावी युद्धाबद्दल तुला दूषण देत आहेत. तर त्या वेळीं तूंच स्वत: येऊन त्यांची काय ती समजूत घाल ! [ जातो. ]

वासं०:—बाबा ! एक क्षणभर थांबा !—देवा ! हे शेवटीं निघून गेले ! पूर्वी माझ्या शब्दाबरोबर मागें परतणारे माझे बाबा माझ्या दु:खपूर्ण वाणीकडे दुर्लक्ष करून रागानं पुढंच निघून जावेत ना ? बाबांनीं माझ्यावर रागवावं, असं माझ्या हातून घडावं, त्यापेक्षां लहानपणींच मेलें असतें तर किती बरं झालं असतं ! पण ते रागावले म्हणून मीं आपला निश्चय काय म्हणून बदलावा ? माझी परीक्षा पाहण्याकरितां तर देवानं हा प्रसंग माझ्यावर आणला नसेल ना ? पण खास देव इतका निष्ठुर नाहीं.

माझ्यासारख्या गरीब मुलीला दुःख देऊन त्याला काय मिळणार आहे ? जो जो बाबा श्रीकृष्णरायासंबंधानं बोलत, तों तों वीररायाची ती वीर-मूर्तिच माझ्या दृष्टीसमोर दिसूं लागे. त्या मूर्तीच्या नुसत्या कल्पनेनं जर बाबांच्या समोर मला धैर्य येतं तर राजमंडळांत प्रत्यक्ष ती मूर्ति डोळ्या-पुढं असल्यावर मी राजमंडळाच्या बळजबरीला काय म्हणून भीक घालीन ? [ जाते. ]



## प्रवेश तिसरा.



**स्थळ**—एक उपशाळा.

[ कोकिळा प्रवेश करिते. ]

**कोकि०ः**—( स्वगत ) शेवटीं ताईमहाराजांनीं आपला हट्ट नाहींच सोडला ! मला बाई भिती पडली होती, कीं महाराजांच्या म्हणण्याप्रमाणं श्रीकृष्णरायांना माळ घालायला त्या तयार होतात कीं काय ? पण बाई माझं भाग्यच थोर, म्हणून तसं कांहीं झालं नाहीं ! हो ! श्रीकृष्णरायांनीं जरी मला इतकं आणाभाका घेऊन सांगितलं होतं, कीं मी तिच्याशीं लग्न करणार तें केवळ तिच्या राज्याकरितां, तें राज्य एकदां हातीं आलं, कीं तिला बाजूला सारून मी तुलाच वरीन आणि तुला आपली पट्टराणी करीन ! तरी बाई मला त्यांचा भरंवसा कसा येणार ? पुरुषांचा काय नियम ? बोलतील एक आणि करतील एक ! पण बाई आतां कांहीं ती काळजी उरली नाहीं ! आतां एकदां देव करो आणि त्यांचं हें कारस्थान तडीला जाऊन ते ह्या साऱ्या केरळ देशाचे राजाधिराज होवोत, म्हणजे मग त्यांची अर्धांगी—त्यांची पट्टराणी—महाराणी—ह्या कोकिळेवांचून दुसरी कोण

होणार ? केरळ देशाची पट्टराणी—महाराणी ! बाई केवढी तरी माझी पूर्व पुण्याई ! नि ती आतां फळाला येणार ! माझ्या शिरावर तो राजमुकुट चढणार ! त्या राजमुकुटावर छत्रचामरं झळकणार ! मंत्रीमंडळ—राजमंडळ अवघी—केरळभूमि मला लवून प्रणाम करणार ! मग बाई मी कशी बरं दिसेन, कशी बरं हंसेन, कशी बरं चालेन, कशी बरं बोलेन, ह्या जाईजुईसारख्या सहस्र दासी माझ्या सेवेला तत्पर असतील नाहीं ? माझ्या हांकेसरशी काय आज्ञा आहे महाराणीसाहेब, म्हणून हात जोडून त्या धांवत येतील नाहीं ? कशी बरं मी त्यांना हांक मारीन ! जाई, अग जाई !

[ जाई घाईनं प्रवेश करते. ]

जाई:—अगबाई, कुणी हांक मारिली; ताईमहाराजांसारखी ! कोण ! कोकिळा !

कोकि०:—कोकिळा ! सटवाई, नीट महाराणीसाहेब—नाहींतर कोकिळामहाराणी असं म्हटलंस तर जीभ झीजेल ?

जाई:—कोकिळा महाराणी ! म्हणजे तूं स्वप्नांत तर नाहींस कोकिळे ?

कोकि०:—( भानावर येऊन ) होय, खरंच जाई ! मी एका गोड-गोडशा स्वप्नांतच होतें !

जाई:—काय ? काय स्वप्न पाहिलंस ? बरीं बाई तुला जागेपणीं स्वप्नं पडतात ! दासींची पट्टदासी झालीस ! आतां पट्टराणीही होऊं म्हणतेस कीं काय ?

कोकि०:—या बाई पूर्व पुण्याईच्या गोष्टी आहेत ! कुणाचं कोण होईल कुणीं सांगावं ! हलका कागदाचा पतंग, पण तोहीं अनुकूल वारा मिळतांच वर चढतो, तसं दैव अनुकूल असल्यावर का नाहीं मी महाराणी होणार ?

जाई:—महाराजांचं मनबीन गेलं आहे कीं काय तुझ्यावर ! तसं असलं तर मात्र बाई खरीखुरी महाराणी होशील ! एरव्हीं स्वप्नांतलीच महाराणी !

कोकि०:—कुणाचं—महाराजांचं !! म्हाताऱ्याची बाईल करतेस मला

सटवे ! म्हाताऱ्याची बाईल होऊं ! म्हाताऱ्याची बाईल होऊन महाराणी होण्यापेक्षां अशी लाथाळून देईन त्या महाराणीपदाला !

जाई:—हो हो—देशील—आहेस ठाऊक मला ! पण बाई, ताई महाराजांची झोपेची वेळ झाली. शय्या करायला जाऊं द्या आधीं ! [ जाते. ]

कोकि०:—बाई, इतकी रात्र झाली का ? जाऊं द्या ! मलाही मोठंच काम आहे. [ जाते. ]



## प्रवेश चवथा.



**स्थळ**—आंबराईतील पटांगण.

जयराम प्रवेश करतो. ]

जय०:—( स्वगत ) अजून तर धन्याची स्वारी इकडे नाहीं आली ! इकडेच व्हावी, हा माझा तर्क खोटा ठरला तर आणखी काय हवं मला ? पण तो खोटा ठरणंच कठिण ! संध्याकाळीं राजवाड्यांतून आल्यापासून एक दहावीसदां स्वारीचा हात समशेरीवर गेला असेल. तेव्हांच मीं तर्क केला, कीं स्वारीच्या तोडीचा कोणी तरी वीर आज राम म्हणणार ! मधून मधून ओठ चावणं, डोळे एकदम लाल होणं, ह्या गोष्टींनीं तर माझ्या तर्काला दुजोराच मिळाला ! इतकं झाल्यावर मला कसं स्वस्थ बसवेल ? धन्याच्या जिवावरच गुदरली तर जन्मभर निमक खाल्ल्याचं कांहीं सार्थक तरी करावं या हेतूनं इथं आलों ! पण स्वारी आलीच ! आतां या राईंत दडून राहून तशीच वेळ आली तर पुढं यावं !

[ आंबराईत जातो व वीरराय प्रवेश करितो. ]

वीर०:—( स्वगत ) माझे पाय असे जड कां झाले ? हा श्रीकृष्ण-

राय म्हणतो, त्याप्रमाणं ती खरोखरच कुलटा ठरली, तर–पण असल्या अमंगळ विचाराला मनांत थारा देणं म्हणजे प्रत्यक्ष पावित्र्याला पायाखालीं तुडवणं ! हा नराधम आलाच !

[ श्रीकृष्णराय येतो. ]

श्रीकृ०:—यायला थोडासा उशीर लागला, तुम्हांला तिष्ठत रहावं लागलं, माफ करा ! पण–वासंतिकेच्या अगदीं महालाशेजारींच असल्यामुळं तुमचा वेळ तुम्हांला कंटाळवाणा नसेल वाटला ? एकना दोन हजारो गोड विचारांनीं मन रमून गेलं असेल नाहीं ?

वीर०:—वासंतिकेसारख्या भूदेवीच्या ध्यानांत निमग्न असतां मन कां रमून जाणार नाहीं ? पण अशा भूदेवीवरही तुम्हांसारखे अधम कुभांड रचायला कचरत नाहींत !

श्रीकृ०:—तिच्यावर मी लटकं कुभांड रचतों, असाच तुमचा कायम समज ना ?

वीर०:—ती व्यभिचारिणी आहे असं सप्राण दाखवी तोंपर्यंत तरी तोच ठाम आहे !

श्रीकृ०:—तो सदैव तसाच राहो ! अज्ञान हें एक सुखाचं साधन आहे असं म्हणतात ! त्याप्रमाणं तुमचा हा अंधळा समज असाच राहून त्या कुलटेच्या काल्पनिक पावित्र्याच्या मनोराज्यांत तुम्हीं सदैव सुखाचा उपभोग घ्यावा अशीच माझी मनापासून इच्छा आहे ! हो, झोपेंत गोड स्वप्न पडत असतां एखाद्याला जागं करणं, हें पापच नाहीं का ? झोपेंत असून सुखाचा अनुभव घेत असतो त्याला बळंच दुःखजागृतींत कशाला ओढा ? शिवाय आपल्याला सुखस्वप्नांतून दुःखद जागृतींत खेचल्याबद्दल तो त्या जागें करणारावर राग काढल्यावांचून राहील ?

वीर०:—बस्स करा ही तुमची बडबड ! वासंतिका जारिणी आहे, असं मुद्यापत्त्यानिशीं झटपट सिद्ध तरी करा, नाहीं तर द्वंद्वाला तरी सिद्ध व्हा !

श्रीकृ०:—मला तरी बोलण्यांत वेळ गमावून काय करायचं आहे हो ? पण एका गोष्टीची आठवण देऊन ठेवतों ! ती ही कीं, आपल्या या केरळ

देशाच्या दंडनीतीनं जारिणी स्त्रीला एक अग्निप्रवेश हेंच शासन ठरविलं आहे, मग ती कुमारी असो वा विवाहित असो, भणंग भिकारीण असो वा महाराणी असो; या अनुशासनाच्या तावडींतून कांहीं ती सुटायची नाहीं !

वीर०:—पण याचं प्रयोजन काय ?

श्रीकृ०:—प्रयोजन आहे तर ! पण आधीं आपल्या क्षात्रधर्माला अनुसरून या माझ्या खड्गावर हात ठेऊन शपथ वहा, कीं वासंतिके-संबंधानं इथ जो प्रकार दिसेल, किंवा जे कांहीं दाखले पहाल, त्यांबद्दल अवाक्षरही रागानं किंवा लोभानं बाहेर काढायचा नाहीं ! हो—नाहीं तर एक करतां एक व्हायचं !

वीर०:—आलं माझ्या लक्षांत !—पण शपथ घेण्याचं कारणच नाहीं. बरं—ही शपथ घेतों ! पुढं ?

श्रीकृ०:—तसंच जारकर्माचा पुरावा पुढं आणून, मीं तुमची पावित्र्यमूर्ति भंगली म्हणून त्याबद्दल माझा सूड घेण्याचा विचारही तुम्हीं मनांत आणावयाचा नाहीं, असंही मला शपथेवर सांगितलं पाहिजे ! खरं म्हटलं तर तुमच्या या गाढ निद्रेंतून तुम्हाला जागं केल्याबद्दल तुम्हीं मला आपला खरा हितकर्ता, खरा मित्र असंच समजलं पाहिजे ! पण जग कांहीं उलटच आहे !

वीर०:—तुम्ही म्हणतां, त्याप्रमाणं जर ती खरोखर कवडीमोल कुलटा ठरली, तर तिच्याबद्दल तुमचा सूड घ्यावा, इतकी तिची किंमतच रहाणार नाहीं !

श्रीकृ०:—बरोबर बोलला हें ! पण आणखी एका गोष्टीबद्दल तुम्हांला शपथ घेतली पाहिजे ! वासंतिका माझ्यासाठीं अगदीं वेडी झाली आहे, याची दाखल्यानिशीं जर तुमची खात्री केली तर तुम्हीं आपलं सारं प्रेम पार फुंकून टाकून या केरळदेशाला कायमचा रामराम ठोकला पाहिजे.

वीर०:—या खड्गाची शपथ घेऊन तुम्हांला सांगतों कीं, मग एक पळभरही मी या नासक्या कुसक्या केरळदेशाच्या हवेंत रहाणार नाहीं !

मग या देशचा राजमुगुटही कोणीं मला देऊं केला तरी त्याला मी असा लाथेनं झुगारून देईन !

श्रीकृ०:—तर मग तुमचं आतां काय जं धैर्य असेल तें दिसूं द्या !

वीर०:—माझं धैर्य रणांगणावरही जितकं कसोटीला लागलं नव्हतं तितकं तुम्ही लावतां आहांत, पण ती जारिणी असल्याबद्दलची प्रमाणं, दाखले, पुरावा, सारीं झटपट पुढें येऊं द्या ! आणि मला या संशयाच्या नरकांतून एकदांचा बाहेर काढा !

श्रीकृ०:—सगळीं पुढं आणतों ! ( एक पत्र त्याच्या हातीं देतो. ) हें अक्षर तुमच्या ओळखीचं असेलच !

वीर०:—हें तर—वासंतिकेचं अक्षर !

श्रीकृ०:—होय, तिचंच हें पत्र ! मला तिजकडूनच आलं आहे— पण तें वांचून तर पहा ? या शुभ्र चांदण्यांत तें दिसायला जड जाणार नाहीं !

वीर०:—( पत्र वाचीत ओंठ चावून. ) अस्सं ! अस्सं !

श्रीकृ०:—( स्वगत ) अजून तूं नरकांत कुठं गेला आहेस ? खरा रौरव नरक तो या पुढंच आहे !

वीर०:—( वाचीत ) "आपल्यावर निश्चल प्रेम करणारी !" अरेरे ! माझी दृष्टि तर मला फसवीत नाहींना ? पण वासंतिका फसवी ठरण्यापेक्षां माझी दृष्टिच फसवी ठरली तर काय वाईट ? ( श्रीकृष्णरायास ) हें पत्र तिनं तुम्हालाच लिहिलं म्हणतां ?

श्रीकृ०:—वर पत्राच्या आरंभीं माझं नांव लिहिलं आहे तें पहा !

वीर०:—( नांव वांचून ) चंद्राला खग्रास ग्रहण तर लागलं नाहीं ? ( पत्र फेंकून देतो. ) आणखी पहाण्याचं कारणंच उरलं नाहीं ! त्यांतल शब्दन्‌शब्द माझं काळीज फाडून खातो आहे ! जारिणी ! तापलेल्या सळया या इथं खुपसल्या असल्यास तरी देखील इतक्या वेदना होत्या ना !

श्रीकृ०:—पण एवढ्यानच काय झालं आहे ? ( शेल्यांत गुंडाळ-

लेली तसबीर काढून ) ही तसबीर पहा, ही तुमच्या प्रहाण्यांतलीच आहे म्हणा !

वीर०:—चित्र !–हें तर तिचच चित्र ! तिनंच मला द्यायचं कबूल केलं होतं ! हरहर ! स्त्री-प्रेमाइतकी निश्चळ वस्तु ब्रह्मांडांत नाहीं असें मी आजपर्यंत म्हणत होतों ! पण जारिणी ! तूं तें निखालस खोटं पाडलंस ! ( विचार करून ) पण हें पत्र आणि चित्र तिच्या बाबानं बळजबरीनं तिजकडून पाठविलीं नसतील कशावरून ? तुमचा सगळा पुरावा एकदम पुढं येऊं द्या कीं हो ! त्या पत्रांत तिनं तुम्हाला बोलावलं आहे, त्याप्रमाणें तुम्ही भेटणार असाल ?

श्रीकृ०:—हो ! हो आतां इतक्यांत ! वेळ झालीच ! याच वेळेस ती त्या समोरच्या खिडकींतून मला खूण करीत असते ! आणि मग आमची स्वारी तिनं टाकलेल्या दोरानं चढून जाते !

वीर०:—ती-तीच खिडकी कोणी उघडीत आहे !

श्रीकृ०:—आतां जरा या झाडाआड व्हा ! म्हणजे तुम्ही तिला न दिसतां, ती मात्र तुम्हाला स्पष्ट दिसेल ! आणि त्या खिडकींतून मला खुणेनं कोण बोलावतं तेंही चांगलं कळून येईल ? वर चढल्यावर चुंबनाच्या मिषानं तिला थोडीशी खिडकींतच थांबवून धरतों; म्हणजे तिची मूर्ति तुम्हाला नखशिखांत पहायला सांपडेल ! ती पहा !

[ खिडकींतली स्त्री खुणावते, श्रीकृष्णराय जातो. ]

वीर०:—( तिला पहातांच भांबावून ) माझे डोळे तर खास फुटले नाहींत ? तीच !, पापिणी आजपर्यंत तुला मीं प्रत्यक्ष पावित्र्याची मूर्ति मानली, ही मी पावित्र्याची केवढी विटंबना केली ! आपल्या जाराकरितां दोरही टाकते आहे ! ( तोंड फिरवून ) नाहीं-नाहीं पहावत माझ्यानं ! ( खिडकीकडे पाहून )-गेला वर चढला देखील ! तिच्या गळ्यांत हात घालून चुंबन घेतो आहे ! आणि ही सटवीही त्याला आंत शय्यामंदिरांत नेण्याकरितां आग्रहानं ओढिते आहे ! पाप्यांनो ! तुमच्या या पापलीला पाहून चंद्र देखील लाजेनं ढगाआड लपला ! पण विश्वशास्ता परमेश्वर एकदम वीज फेंकून या पाप्यांना अजून कां नाहीं शासन करीत ? अभागी



वीरराय खड्ग कोशांतून बाहेर काढून छातींत खुपसणार तोंच जयराम पुढें येऊन हात धरतो.

पान ३९ अंक दुसरा.

वीरराया, तूं मात्र अभागी खराच ! जिच्या ठिकाणीं तूं आपलं सारं प्रेम, आपल्या आशा साठविल्यास, जिला आपलं सर्वस्व वाहिलंस, जिला आपलं परमेष्ट-आराध्य दैवत लेखून स्वतःला धन्य मानलंस, तिनंच जारिणी ठरून नरकाची स्वामिनी होऊन तुला या नरकयातना भोगावयास लावल्या; यापेक्षां वीरराया ! तुजवरच वीज पाडून देवानं या यातनांचा अंत केला तर किती उत्तम !–पण एका क्षणार्धांत सर्व दुःखाचा अंत करणारी माझी ही सहधर्मचारिणी–( खड्ग कोशांतून बाहेर काढून ) माझीही खरी अर्धांगी जवळ असतां देवाला तरी साकडं कां घालावं ?–रणांगणावर आजपर्यंत माझी जशी एकनिष्ठपणें सेवा केलीस तशी आजही शेवटची सेवा करून—[ छातींत खुपसणार तोंच जयराम पुढं येऊन हात धरतो. ]

जय०:—काय हें धनी महाराज ! आपल्या जिवावर उठला त्यापेक्षां या दासाच्या छातींत तें खड्ग खुपसून माझ्या जिवाला होणाऱ्या वेदनांचा अंत तरी करा !

वीर०:—तूं इथं कशाला आलास ?

जय०:—संध्याकाळपासून आपल्या मनाची उडालेली तळमळ मीं पाहिली ! ती मला स्वस्थ बसूं देईना ! माझ्या अटकळीप्रमाणं आपण इथंच सांपडला ? आपल्या जिवावर बेतली तर आपली भाकरी खाल्ल्याचं सार्थक तरी करावं येवढ्याचकरितां मी येथें आलों, पण आपणच आपल्या जिवावर उदार व्हाल, असं माझ्या स्वप्नींही नव्हतें : देवाच्या दयेनं मी ऐन वेळीं इकडे आलों म्हणून सारं टळलं ! [ वीररायाचें खड्ग घेतो. ]

वीर०:—देवाच्या मनांत मला या यातनांतच खितपत ठेवायचं आहे, म्हणून त्यानं तुला इकडे धाडलं ? अरेरे ! हें हृदय फुटून गेल्यावांचून जिवाला समाधान नाहीं मिळायचं !–चल दे तें खड्ग इकडे ! आत्मघातावांचून असल्या दुःखाला कां दुसरं औषध आहे ?

जय०:—महाराज काय हें ? आपल्यासारख्या अवघ्या जगाला भूषण झालेल्या वीराला हें शोभतं का ? येईल तो प्रसंग धैर्यानं सोसणं हेंच वीराला उचित !

वीर०:—जयरामा, मी का उगीच वेडा झालों ? तसंच कारण असल्यावांचून का मी स्वत:च्या प्राणावर उठेन ! पण तुझं म्हणणं बरोबर आहे ! दु:खाला भिऊन आत्मघात करणं म्हणजे भ्याडासारखं रणांगणावरून पळून जाणं आहे ! निमुटपणें दु:ख गिळणं हेंच खरं शौर्य ! पण जयरामा, आधीं या नरकपुरींतून जितकं दूर जाववेल तितकं दूर जाऊं चल ! आज तूं मला खराखुरा वीर बनविलेंस ! आतां खवळलेल्या समुद्रावरून किंवा हिमालयाच्या बर्फमय तुटलेल्या कड्यावरूनही जाईन ! किंवा क्षुधेनं प्रक्षुब्ध झालेल्या सिंहाशींही दोन हात खेळेन ! पण इत:पर ज्याला खपुष्प पाहिजे असेल, त्यानं स्त्रीप्रेमाचा शोध करावा ! राक्षसी स्त्रीजात !

[ जातात. ]



# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.



**स्थळ**—श्रीकृष्णरायाचा महाल.

[ श्रीकृष्णराय सचिंत बसलेला दिसतो. ]

श्रीकृ०:—( स्वगत ) ती तर मेलीच पाहिजे, त्यावांचून मार्गच नाहीं दुसरा ! आतां तिच्यावर हें नसतं कुभांड रचून तिला उभी जाळणं म्हणजे उघड उघड स्त्रीहत्त्या करणं आहे हें खरं; पण त्याला मी तरी काय करूं ? ह्या पापाच्या पायरीवर पाय ठेवल्यावांचून राजपदावर चढणार कसा ?—तें कांहीं नाहीं ! पण ह्या पापपुण्याचा विचार करण्याचं आपल्याला कारणच नाहीं ! आजकाल ह्या पापपुण्याचा विचार करतो आहे कोण ? जगांत जो कांहीं प्रामाणिकपण, जी कांहीं नीतिमत्ता दिसते आहे, ती ह्या पापपुण्याच्या विचारामुळें, कीं शासनाच्या धास्तीमुळं ? शासनाची भीति नसती तर कितीशी नीतिमत्ता— कितीसा प्रामाणिकपणा दिसून येता ? केवळ ह्या शासनाच्या भीतीनेंच प्रत्यक्ष पापाचरण घडत नाहीं ! पण मनांत आपण पापांचे पर्वत रचीत असतोंच ! मग ह्या मनांत घडत असलेल्या पंगू पापाला प्रत्यक्ष कृतीचं रूप दिल्यानं कुठसं बिघडतं ? उलट ह्या पापशासनाच्या भीतीला बाजूला सारून मनांत आलें तें निर्भीडपण कृतींत उतरणं, हाच खरा प्रामाणिकपणा ! ( रुद्राक्षराय येतो. ) रुद्राक्षराय ! ठीक आलास ! मी अगदीं वाट पाहतों आहें ! ज्या कामाकरितां इतक्या तातडीनं तुला निरोपावर निरोप धाडले तें कामच असं कांहीं नाजूक आहे कीं, तुझ्या- वांचून होणंच नाहीं ! असं पहा, आज मी वैर आणि राज्यलोभ या

दोघां बुभुक्षितांना पंचपक्वान्नाचं भोजन चारून त्यांची आकंठ तृप्ति करण्याचा घाट घातला आहे! पण पाकसिद्धीच्या कामीं तुझं साहाय्य असल्यावांचून तो फुकट आहे!

रुद्रा०:—माझं हें खड्ग आणि वाणी आपल्या चरणीं एकदां वाहिलेलीच आहेत! त्यांचा काय वाटेल तो उपयोग करून घेऊन मला धन्य करावं हीच माझी नेहमीं हात जोडून प्रार्थना आहे ना?

श्रीकृ०:—रुद्राक्षराय, माझ्या आशावृक्षाला फळं येण्याची वेळ आतां अगदीं जवळ आलेली आहे! आणि तुझ्या स्नेहाच्या परीक्षेचीही वेळ हीच! या परीक्षेंतून उतरलास, तर माझ्या भाग्याचा अर्धा अधिक वांटेकरी तुझ्यावांचून दुसरा कोण होईल?

रुद्रा०:—(हात जोडून) आजपर्यंत दासावर जसा लोभ आहे, तसाच पुढेंही रहावा! म्हणजे आपल्या कृपेनं काय कमी आहे? मी आपल्याच अन्नाचा! खाल्लेल्या अन्नास या वेळीं जागलों नाहीं, तर माझ्यासारखा कृतघ्न मीच!

श्रीकृ०:—खरं म्हटलं तर तुझ्या या प्रेमाची फेड मजकडून जशी व्हावी तशी आजवर झालीच नाहीं! पण राया! आजचा हा डाव साधला, कीं त्या सगळ्याचा वचपा काढल्यावांचून मी राहत नाहीं!

रुद्रा०:—विश्वास टाकून काय ती कामगिरी कळूं द्या! आणि जर नाहीं झाली, तर मला आपला दासच म्हणूं नका!

श्रीकृ०:—अरे, तुझ्यावर माझा विश्वास आहे कीं नाहीं, हें का मीं सांगायला पाहिजे? (स्वगत) याच्यावर विश्वास! (उघड) तेव्हां तूं करायचं काम तें इतकंच कीं, आजच्या या राजमंडळाच्या सभेंत अगदीं माझ्याजवळ येऊन बसायचं! मी जे कांहीं बोलेन त्याला पुष्टि द्यायची? ज्या व्यक्तीवर मी आरोप करीन, ती व्यक्ति शासनाला सर्वथैव पात्र आहे, म्हणून पुटपुटायचं! आणि जें पातक त्या व्यक्तीनं केल्याचं मी सांगेन, तें त्या व्यक्तीला करतांना पाहिल्याचं—वेळ आली, कीं शपथेवर सांगायचं! बघ, होईल इतकं?

रुद्रा०:—यांत न होण्यासारखं काय आहे? या आपल्या—एवढंस

खोटं बोलण्याच्या पातकापेक्षां कृतघ्नपणाचं पाप मी फार मोठं समजतों! खाल्लेल्या अन्नाला जागण्याकरितां असल्या एक नाहीं हजार खोट्या बाता मारायला कसचं——

श्रीकृ०:——तुझ्या साक्षीवर राजमंडळाचा विश्वास बसावा म्हणून, ही साक्ष तूं अगदीं आपल्या जिवावर-केवळ पापशासनाच्या थोर हेतूनं प्रेरित होऊन देत आहेस; असं दाखव; मुद्रा अगदीं कष्टी दिसूं दे! आणि मीं काय पाहिलं तें सांगणं मंडळानं मला भाग पाडूं नये, अशी प्रस्तावना करून मी म्हणेन तें पाहिल्याचं सांगायचं! शेवटीं मंडळानं दया करून हा अपराध पोटांत घालावा! माणसाकडून—विशेषत: तरुण माणसाकडून चुका व्हायच्याच! सगळ्याच अपराध्यांना शासन करावयाचं तर प्रजेपैकीं कितीसे सुटतील? वगैरे वगैरे औपचारिक गोष्टींचा पाढा वाचायचा! म्हणजे साक्षीला महत्त्व येऊन ती विश्वसनीय धरली जाईल, समजलं!

रुद्रा०:——मला का हें शिकवायला पाहिजे? असल्या सोंगाची वतावणी कशी करायची, याचं मी बाळकडूच प्यायलों आहें! एवढं आपण ध्यानांत ठेवावं!

श्रीकृ०:——ते तर खरंच! पण या गोष्टी सांगून ठेवणं हें माझं काम आहे ना? (स्वगत) काय चमत्कार आहे? या ठकालाही आपल्या ठकबाजीचा अभिमान! पण माझ्यासारखा ठकास महाठक भेटला, म्हणजे असल्या ठकालाही मेणाहून मऊ बनवून आपल्या पंक्तीं लाऊन घेतों. (उघड) पण रुद्राक्षराय आतां वेळ गमावण्यांत कांहीं अर्थ नाहीं! राजमंडळ भरायची वेळ आली! आणखी जें कांहीं तुला सांगायचं आहे तें सभागृहांतच सांगेन! मी जरा पुढें होतों, तूं मागाहून ये.

[जातात.]



## प्रवेश दुसरा.



स्थळ—राजवाड्याच्या जवळ.

[ रुद्राक्षराय प्रवेश करतो.]

रुद्रा०:—हे श्रीकृष्णराय आज कोणच्या नाजुक पुतळीला आगींत घालून सुलाखून काढणार आहेत कांहीं कळत नाहीं ! आपल्याला काय, बायकांना जाळण्यांत आम्हांला कांहींएक वाटत नाहीं. पण माझ्या चंडिकेवर जर त्यांनीं हा प्रसंग आणला तर त्या आगीच्या ज्वाळेचे चटके माझ्या अंगाला नाहीं का बसणार ? चंडिकेसंबंधानें जर श्रीकृष्णरायाची तयारी असेल, तर हा रुद्राक्षराय महारुद्राचा अवतार घेऊन त्या मदनाच्या बापाला या श्रीकृष्णरायालाही जाळून भस्म करील. आणि तें भस्म म्हणजे माझ्या चंडिकेचा अंगारा म्हणून लोकांच्या कपाळाला लावीत सुटेन. पण ही चंडिका आलीच. ( चंडिका येते. ) ये चंडिके, बरी आलीस. मला खरं खरं सांग हं ! पण सांगशील ना ?

चंडि०:—पण काय सांगायचं तें तर अगोदर कळूं द्या. प्रश्न काय तो कळल्यावांचून काय सांगावं बाई ?

रुद्रा०:—हें पहा, श्रीकृष्णरायानं तुला कधीं पाहिलं आहे का ?

चंडि०:—हो, पुष्कळदां ! कालसुद्धां त्यांनीं मला पाहिलं !

रुद्रा०:—काल पाहिलं ! कुठं ?

चंडि०:—काल श्रीकृष्णराय आणि कोकिळा कांहीं तरी हितगुज बोलत होते, इतक्यांत मी तिथं गेलें. तों म्हणतात कसं, हें घुबड इथं कशाला आलं ?

रुद्रा०:—यंवरे पाखरूं ! तरी म्हटलं माझी पारख चुकली कशी. घुबड झालं तरी पांखरूंच कीं नाहीं—आणि श्रीकृष्णराय आणि कोकिळा यांचं हितगुज चाललं होतं काय ? ठीक आहे !

चंडि०:—काय ठीक आहे ? आपण असे डोळे का फिरवलेत.

रुद्रा०:—नाहीं म्हटलं ! श्रीकृष्णरायाचं बिंग मला कळलं आतां ! त्यांनीं तुझं माझं प्रेमसंभाषण ऐकलं तरी भय नाहीं. तो तुला वैरायच्या तजविजींत असतां, तर माझ्या अंगचीं लाहीं होऊन त्याचे फुटाणे उडविले असते !

चंडि०:—पण मला बाई भय वाटतं ! आपलं लगीन एकदां लवकर उरकून टाकावं ना ?

रुद्रा०:—लवकरच करूं बरं ! मला आतां वेळ नाहीं. मला आतां दरबारला जायचं आहे ! मी आज श्रीकृष्णरायांच्या मांडीला मांडी भिडवून बसणार आहें.

चंडि०:—म्हणजे ?

रुद्रा०:—म्हणजे काय ? त्यांच्या तोंडाबरोबर तोंड सोडणार आहें. त्यांच्या मुद्रेबरोबर मुद्रा फिरवणार आहें. त्यांच्या डोळ्याबरोबर डोळा चमकविणार आहें, आणि त्यांच्या हाताबरोबर हात फलकावणार आहें.

चंद्रि०:—वा ! मग आज दरबारांत आपण बरेच मोठे होणार आहां !

रुद्रा०:—नुसता मोठा होणार नाहीं. तर श्रीकृष्णरायाला जें मिळेल त्यांत मी अर्ध्याचा वांटेकरी होणार आहें.

चंडि०:—म्हणजे आपण त्यांची अर्धांगी होणार असंच म्हणाना ?

रुद्रा०:—तुला शब्दाचा अर्थ कळत नाहीं ! अग अर्धांगी म्हणजे बायको. तसा माझ्या म्हणण्याचा अर्थ नाहीं, श्रीकृष्णरायाला जर अर्ध राज्य मिळालं, तर त्यांतलं अर्धराज्य मला मिळणार !

चंडि०:—आणि श्रीकृष्णरायाला फांसावर चढवलं तर—

रुद्रा०:—तर मात्र काय होईल सांगतां येत नाहीं. खरंच सुखाच्या कल्पनेबरोबर दुःखाचा विचार जर लोक करते तर ते मृगजलाच्या मागं लागले नसते.—बरं पण तूं जा आतां. ठरल्या वेळीं ये हं !

चंडि०:—अगदीं वेळेवर येतें. [ जाते. ]

रुद्रा०:—आज आपल्या भाषणाची नक्कल चांगली पाठ झाली.

सकाळपासून चार रंगी तालमी मिळाल्या. चंडिका, जाई, चमेलं
चवथी–चवथी आठवत नाहीं ! हो, आठवली ! मी कसा
पहावं, म्हणून आरशांत माझ्याकडं पाहून, मीं चवथी तालीम
कोकिळेजवळच्या रंगी तालमींत मात्र आमचं थोबाड बरंच रंगलं
कोकिळेचं बिंगही सांपडलं आहे ! चला आतां दरबारला जाऊं.



## प्रवेश तिसरा.



[ सभासद आपल्या स्थानीं बसले आहेत. श्रीकृष्णराय व
रुद्राक्षराय एकमेकांशीं कुजबुजत आहेत. पद्मराय
व बलिभद्र हे उभे आहेत. ]

बलि०:—ती दुक्कल पाहिली कां ? मघांच पासून एकमेकां
खलबत करीत आहेत ! मग आज कसला घाट बांधण्याचा
घाटत आहे हरी जाणे !

पद्म०:—राहू आणि केतूच ते ! एकएकटाच सगळ्या अ
ग्रास करील ! मग दोघेही एक झाल्यावर काय नाहींत करणा
पाताळयंत्री रुद्राक्ष म्हणजे या श्रीकृष्णरायाचा उजवा हातच ! य
ळाच्या राक्षसी कल्पनांना त्या सैतानानें कृतीचें रूप द्यायचें ! अस
महाठकांची जोडी सगळ्या त्रिभुवनांत नाहीं मिळावयाची !

बलि०:—पण अलीकडे हे वेताळ जरा नरमाईनें सगळ्यां
बोलून वागतात नाहीं ? जो गडी कालपर्यंत आम्हां सैनिकांना व
मान मानी, केरळ देशाची कुसुरुंडं म्हणे, तोच आज आपली गुरु

ऊन ठेऊन, कोणी सैनिक दिसलारे दिसला, कीं त्याजवळ सलगीनें बोलून अवघ्या सेनेची स्तुतिस्तोत्रें गातो, यावरून—

पद्म०:—राज्याला कांहीं तरी धोका आहे, हें खास ! या श्रीकृष्ण-रायाइतका अभिमानी, आंतल्या गांठीचा आणि उलट्या काळजाचा पुरुष मीं तर कोठें पाहिला नाहीं ! तेव्हां सैनिकांशीं जर तो इतक्या नरमाईनें, गोडीगुलाबीनें वागतो आहे, तर तें कांहीं गूढ हेतु साधण्याकरितांच !

बलि०:—काळाच्या पोटांत काय आहे आणि काय नाहीं कोणीं सांगावं ! हा श्रीकृष्णरायच आमचा राजा होणार नाहीं म्हणून कशावरून ?

पद्म०:—माझा तर तर्क वहातो कीं, याचा कावा साधला तर तो खास केरळ देशाचा राजा होणार ! ( " केरळ-राजाधिराज हरदेवराय महाराज " असें वेत्रधारी ओरडतात. ) महाराज आले ! उदंड आयुष्य असो त्यांना ! आज बरोबर ताईमहाराजही आहेत.

[ पुढें वेत्रधारी मागें हरदेवराय, वासंतिका प्रवेश करितात.
सर्व सभासद खडी ताजीम देतात. मुख्य सिंहासनावर
राजा व जवळील लहान सिंहासनावर वासंतिका
बसतात. श्रीकृष्णराय, रुद्राक्षराय अगदीं पुढें
राजसिंहासनाजवळ येऊन बसतात. ]

श्रीकृ०:—राजाज्ञेप्रमाणं आज सर्व मंडळ भरलेलं आहे तेव्हां—

हर०:—पण आमचे शूर सेनापति कुठं आहेत ? ते तर आमच्या राज्याची ढाल ! परचक्रापासून राज्याचं रक्षण कोणत्या रीतीनें—कसं करावं—याचा विचार करण्याकरितां आपण आज जमलों आहों ना ? मग अशा प्रसंगीं वीररायांच्या सल्ल्यावांचून आपण काय ठरविणार ? म्हणून कामास आरंभ करण्यापूर्वीं त्यांची वाट पाहिली पाहिजे !

श्रीकृ०:—पण सेनापतींना आज सभेस येतांच येणार नाहीं ! आणि त्याचं कारणही थोड्याच वेळानं सांगतों !

वासं०:—( स्वगत ) येतां येणार नाहीं ? नि त्याचं कारण याला

घातक !–म्हणतांतना मन चिंती तें वैरी न चिंती ! आई महादेवी ! त्यांना सुखरूप असूं दे !

हर०:—स्वराज्यावर ओढवलेल्या संकटाला प्रतिरोध करण्याकरितां काय व्यवस्था करावी, याचा विचार घेण्याकरितां मंडळाला आज बोलावून घेतलं ! खरं म्हटलं तर वीरांना अशा प्रसंगीं भरतं यावं ! आपल्या सेनापतीची तर अशा कामीं पहिली उडी असायची ! असं असून ते आले नाहींत, तेव्हां तसंच कांहीं अपरिहार्य कारण असलं पाहिजे !

श्रीकृ०:—महाराज आणि सभासदहो ! परचक्राचं निवारण करण्याकरितां काय योजना करावी, याचा विचार करण्याकरितां आपण जमलों आहों, हें खरं ! परंतु एखाद्या महारोगानें अगदीं काळीजच घेरण्याचा प्रसंग आला म्हणजे निष्णात धन्वंतरी ज्याप्रमाणं शरीराच्या इतर भागाकडं क्षणभर दुर्लक्ष करून, आधीं काळीज सुरक्षित राहील अशा औषधांची योजना करतो, त्याप्रमाणंच आज आपल्या देशाच्या काळजाला—आपल्या नैतिक पावित्र्याला—आपल्या उज्ज्वल सच्छीलाला—आपल्या धार्मिक शुद्धतेला—अपवित्रतेच्या अधर्माच्या महारोगानं घेरलं असतां तें काळीज—म्हणजे आपली राष्ट्रीय नीतिमत्ता सुरक्षित राखण्याच्या योजनेला आपण आधीं लागलं पाहिजे. घर पोंखरणाऱ्या घरच्या शत्रूचं पारिपत्य न करितां त्यांना निर्धास्त राहूं देऊन, आधीं परशत्रूच्या शासनाची तजवीज करणं याला काय म्हणावं तें मला कळत नाहीं !

हर०:—काय ? केरळदेशच्या कोणीं अधमानं देशद्रोह करून विश्वासघातानं शत्रूशीं कारस्थान चालविलं आहे ? बोला ! बोला ! कोण तो ? तो प्रत्यक्ष माझा उजवा हात—माझ्या पोटचा गोळा—असला तरी त्याला क्षमा होणार नाहीं !

श्रीकृ०:—राजधर्माप्रमाणं आपण प्रजेच्या हिताकरितां पोटचा गोळाही कापण्यास तयार असलं पाहिजे ! पण अगोदर मीं अत्यंत नम्रतापूर्वक न्यायमंत्री हंसाचार्य यांना असं विचारतों कीं, केरळदेशच्या दंडनीतिशास्त्रांत व्यभिचारिणीसंबंधानं जें अनुशासन घातलेलं आहे, तें काय हेतूनं ?

हंसा०:—दंडनीति-शास्त्रांतच त्याचा हेतु विशदपणें सांगितला आहे.

तो असा कीं, ' देशांत अनाचार, वैवाहिक अनीति व व्यभिचार वाढून वर्णसंकर होण्याची वेळ आली; तेव्हां या अनाचारास, वैवाहिक अनितीस व व्यभिचारास आळा बसावा या हेतूनं, व्यभिचारिणीनं—मग ती विवाहित असो वा अविवाहित असो, भणंग असो वा राजकुलोत्पन्न असो, पापक्षालनास्तव अग्निप्रवेशच केला पाहिजे ! असं अनुशासन दंडनीतिशास्त्रांत राजाज्ञेनं आणि राजमंडळाच्या संमतीनं घातलेलं आहे !

श्रीकृ०:—ह्या अनुशासनाप्रमाणं अपराध्यास आज ही शिक्षा होईल काय ?

हंसा०:—नि:संशय ! ह्या अनुशासनाप्रमाणं अपराध्यास आजही शिक्षा झालीच पाहिजे ! सगळ्या दंडनीतींत या व्यभिचार-प्रतिबंधक अनुशासनाइतकं स्पष्ट आणि सर्वश्रुत असें दुसरें अनुशासन नाहीं.

हर०:—( वासंतिकेस ) याच्या या प्रश्नाचा रोख तरी काय ? मुद्रा पहा कशी पालटतो आहे ! कपाळाला आठ्या काय घालतो ! भृकुटि काय चढवितो ! खरोखर ह्याच्या मनांत कांहीं तरी प्रबळ विकारांचं युद्ध चाललं आहे !

वासं०:—विकारांचं युद्ध ? बाबा, हा जन्माचा नटवा ! सगळे नाटकी आविर्भाव दाखवितो आहे ! मग आज याला कोणता प्रबंध रचायचा आहे देव जाणे !

श्रीकृ०:—राजमंडळापुढं विचाराकारितां जी गोष्ट मला आतां मांडायची आहे, ती मांडण्यास आधीं मला महाराजांची अनुज्ञा मिळाली पाहिजे.

हर०:—आमची पूर्ण अनुज्ञा आहे ! आपलं म्हणणं निर्भीडपणं मंडळापुढं ठेवण्याचा अधिकार प्रत्येक सभासदाला आहेच !

श्रीकृ०:—पण ती गोष्ट पुढं ठेवण्यापूर्वी हंसाचार्यांना माझी आणखी विनंति आहे; आरोपसिद्ध्यर्थ काय विधि व्हावा लागतो, तें त्यांनीं मला सविस्तरपणानं सांगावं.

हंसा०:—आरोपसिद्धिविधिसंबंधानं दंडनीतींत असं सांगितलं आहे कीं, आरोपित स्त्रीला राजसभेंत आणल्यावर आरोपकानं आरोपसिद्ध्यर्थ एक

तरी साक्षी पुढं आणावा. साक्षीनं आरोप सिद्ध केल्यानंतर राजमंडळाच्या आज्ञेनं उभ्या नगरांत शिंग फुंकून अशी द्वाही फिरवावी कीं, आरोपित स्त्रीकरितां आरोपकाशीं द्वंद्व करायला कुणी वीर तयार असेल तर त्यानं दोन प्रहरांत श्रीगोकर्णेश्वराच्या मंदिरासमोरील पटांगणांत दाखल व्हावं. द्वाहीप्रमाणं द्वंद्व होऊन त्या द्वंद्वांत आरोपक पराजित झाल्यास आरोपी स्त्री दोषमुक्त व्हावी. पण तिचा वीर पराजित झाल्यास तिला निःसंशय जारिणी ठरवून अग्निप्रवेश करायला लावावं !

श्रीकृ०:—तर मग माझ्याशीं द्वंद्व करायला जारिणीपक्षाचा कुणी वीर सिद्ध असेल तर त्यानं दोन प्रहरांत गोकर्णेश्वराच्या मंदिरासमोरील पटांगणांत दाखल व्हावं, अशी द्वाही आधीं फिरविण्यांत येऊं द्या !

हर०:—पण जारिणी कोण ? साक्षी कोण ? तें कांहींच आम्हांला कळलं नाहीं !

श्रीकृ०:—हे निर्घृण न्यायदेवते ! पाप्याला शासन मिळून केरळदेशांत नीतिमत्ता, धर्म व सदाचरण यांची जोपासना व्हावी, या सद्धेतूनं प्रेरित होऊन मीं आज तुझ्या आसनापुढं एका जारिणीस ओढून आणण्याचा विचार केला आहे ! पण सदयता, प्रेम, फाजील कोंवळेपणा हीं आड येऊन मला तिचं नांवच घेऊं देत नाहींत ! जिव्हा लुली पडते ! डोळ्याला पाणी येतं, शरीराला कंप भरतो ! तर तूं आपलं हृदयस्थ तेज प्रगट करून या कोमल मनोविकारांना दूर कर; व केरळदेशाची दंडनीति जागृत आहे हें जगाला दाखीव.

हर०:—केरळदेशाची दंडनीति निजली आहे, असं म्हणायला आम्हीं वा राजमंडळानें आजवर केव्हांही कारण दिलेलं नाहीं.

श्रीकृ०:—महाराज आणि सभासदहो ! आजचं हें काम करणं माझ्या कसं जिवावर आलं आहे, हें आपणाला दिसतंच आहे ! पण तें मला केलंच पाहिजे. ह्या देशाच्या नागरिकाच्या एका पवित्र कर्तव्यांतून मला मोकळं झालंच पाहिजे ! तेव्हां त्याला मी आरंभ करतों ! काल रात्रीं चंद्र असा अर्ध्यावर आला होता; त्या वेळीं मी व ( रुद्राक्षरायाकडे बोट करून ) हे रुद्राक्षराय त्या अंबराईतील पटांगणाकडे सहल करायला गेलों होतों.



**श्रीकृष्णः**—सेनापति वीरराय आणि ही कुलांगार राजकन्या त्या वेळीं...शृंगारचेष्टांत दंग झालेलीं मला दिसलीं.

पान ५१ अंक तिसरा.

रुद्रा०:—मी तेव्हां यांच्याबरोबर नसतोंच तर किती बरं झालं असतं! किंवा पौर्णिमेच्या त्या शुभ्र चांदण्याऐवजीं त्या वेळीं अमावास्येचा काळाकुट्ट अंधकार पडला असता, तरीही बरं होतं! म्हणजे मीं प्रत्यक्ष या डोळ्यांनीं जें पाहिलं, (जीभ चावून) काय मीं म्हटलं! महाराज क्षमा करा, माझ्यानं त्याचा उच्चारही करवत नाहीं! कृपा करून मला साक्ष देणं भाग पाडूं नका. कारण ह्या जिव्हेनं मीं त्याचा उच्चार कधीं काळीं केला तर ती छाटूनच टाकीन, अशी मीं त्याच वेळीं आपल्या मनोदेवतेला साक्ष ठेऊन प्रतिज्ञा केली आहे.

हंसा०:—श्रीकृष्णराय! तुमचं बोलणं पुढं चालूं द्या! या गृहस्थांना बोलायला लावणारी सर्व यंत्रसामग्री राजसभेंत सिद्ध आहेच! एकूण हे गृहस्थ तुम्हांबरोबर होते!

श्रीकृ०:—होय, हे माझ्याबरोबर होते! आम्ही असे पटांगणांतून राजवाड्याकडील आंबराईत शिरलों, तों माझं लक्ष सहजगत्या ताईमहाराजांच्या महालाकडं गेलं! त्या वेळीं दुसऱ्या मजल्यावरील अगदीं समोरची खिडकी सताड उघडी होती. खिडकीच्या आंत मला जो प्रकार दिसला, त्यानं मी तर थिजून गेलों! माझी दृष्टि त्या देखाव्यानं करपून गेली! डोळे तात्काळ मिटले! केरळदेशाच्या गळ्यांतले ताईत—राजमंडळाचे युद्धमंत्री—महाराजांचे लाडके सेनापति वीरराय आणि ही कुलांगार राजकन्या त्या वेळीं आलिंगनचुंबनादि—शृंगारचेष्टांत दंग झालेली मला दिसली! [वासंतिका एकदम उठते, सर्व आश्चर्यचकित होतात.]

हर०:—कारटे!

वासं०:—चांडाळा! रौरव नरकांत पडशील! काळसर्पा! तुझ्या विषाच्या आगीनंच तुझी रक्षा होईल! जगदंबे! मी कशी आहें! याची तूंच एक साक्षी आहेस!

श्रीकृ०:—सभासदहो! मीही जगदंबेची शपथ घेऊन सांगतों कीं, मीं जें पाहिलं तेंच आपणापुढं ठेवीत आहें! ताईमहाराजांवर मी जर खोटा आरोप घेत असेन, तर तो सर्वसाक्षी गोकर्णेश्वर मला शासन करील!

हंसा०:—रुद्राक्षराय! हा प्रकार तुम्हींही पाहिला असेल, तर श्रीगोकर्णेश्वराची शपथ घेऊन खरं काय तें सांगा.

रुद्रा०:—न्यायमूर्ति! श्रीगोकर्णेश्वराची शपथ घेऊन सांगायचं, तर मीं तो सर्व प्रकार पाहिला, असंच म्हटलं पाहिजे! परंतु अपराध्यावर दया करून—

वासं०:—सैताना! पूर्वजन्मीं मीं तुझा कोणता घोर अपराध केला होता, म्हणून तूं त्याचा सूड घेण्याकरितां या चांडाळाची साथ करतो आहेस! मांगांनो! मला अबलेला छळून तुम्हांला काय मिळणार आहे! या पातकाबद्दल देव तुम्हांला योग्य शिक्षा भोगायला लावील समजलांत!

हर०:—जगदीशा! वृद्धपणीं ह्या यमयातना देण्याकरितांच कां मला जिवंत ठेवलंस? माझ्या प्राणाची प्राण—माझी जीवितसर्वस्व—वासंतिका मला अभाग्याला ह्या वयांत मुकून मीं वेडा व्हावं, एवढ्याचकरितां कां हे गोकर्णेश्वरा! माझ्याकडून आजवर नानाप्रकारानं सेवा घेतलीस! (श्रीकृष्णरायास) काळसर्पा! आजवर तुला दूध पाजून वाढविला, या पातकाबद्दल सूड घेण्याकरितां कां मला दंश करतोस? माझ्या लाडक्या, वासंतिकेनं तुला वरावं, म्हणून तिचं मन वळविण्याचा प्रयत्न केला, या अपराधाबद्दल माझ्या हृदयांत असंख्य सळया खुपसून मला ठीक शासन केलंस!

श्रीकृ०:—महाराज! आपल्या प्रेमछत्राखालीं मी लहानाचा मोठा झालों! त्याबद्दल मी आपला जन्माचा ऋणी आहें—हें मीं आपल्याला बोलून कां दाखवायला पाहिजे? आतां, ताईमहाराजांचं पापाचरण मीं आज मंडळापुढं ठेवलं आहे, तें आपल्याला दुःख द्यावं या हेतूनं वा राज्यतृष्णेनं, वा कोणाचा दावा साधावा या हेतूनं ठेविलं आहे, कीं केवळ न्यायबुद्धीनं प्रेरित होऊन केरळदेशाच्या हिताकरितां ठेवलं आहे, तें एक सर्वांतरसाक्षी परमेश्वरासच ठाऊक! सभासदहो, आपणही माझ्या प्रमाणंच केवळ न्यायबुद्धीनं प्रेरित होऊन देशहिताकरितां राजकन्येवरली आपली सर्वममता बाजूला ठेऊन, मीं केलेल्या आरोपाचा विचार करावा, आणि अपराध्याला योग्य तें शासन द्यावं!

वासं०:—चांडाळा ! तुझा हा छळ मी कुठवर सोसूं ? केवळ न्यायबुद्धीनं प्रेरित होऊन देशहिताकरितां हें करतो आहेस, कीं आपला दावा उगवण्यासाठीं या दीन गाईला छळतो आहेस, हें तूं आपल्या मनालाच विचार ! तूं आणि या तुझ्या पढविलेल्या पोपटानं मला पापिणी ठरविलीच आहे ! तेव्हां आतां राजमंडळ मला अग्निप्रवेश करायला लावणार हें मी जाणून आहें ! पण एवढं ध्यानांत ठेव कीं, ती सर्वसाक्षी जगदंबा जसं माझं आचरण पाहते आहे, तसं तुझं कृष्णकर्मही पाहते आहे ! ती तुला माझ्या हत्येबद्दल शासन दिल्यावांचून रहाणार नाहीं !

श्रीकृ०:—सभासदहो ! आपले वीरराय आज कां आले नाहींत, हें मी आपल्याला आतां सांगायला पाहिजे असं नाहीं !

वासं०:—देवा ! मजवर या दुष्टांनीं घाला घातला आहे, तसा त्यांच्यावरही घातला असला तर सद्गुणी, निष्कपटी, निष्कलंक आचरणाच्या तुझ्या भक्तांकरितां हें जगच नव्हे, असं म्हणावं लागेल ! देवा ! तूं निजलास तर नाहींस ना !

हर०:—हंसाचार्य ! वीररायांना शोधून आणण्याकरितां अगोदर दूत जाऊं द्या !

श्रीकृ०:—शोधण्याचे श्रम करायला नकोत ! वीरराय कां नगरांत आहेत, ते तुह्मांला सांपडतील ? कालरात्रीं पाहिलेल्या गोष्टीनं तळपायाची आग मस्तकाला जाऊन मीं त्यांना द्वंद्वाचें आव्हान केलें ! पण ते तर भीतीनं नगरांतून पळूनच गेले !

हर०:— वीरराय पळून गेले ? गोकर्णेश्वरा ! आतां मात्र तूं माझा अंत पाहिलास ! माझ्या लाडकीला आतां मृत्यूवांचून सुटकाच नाहीं !

वासं०:—आई महादेवी ! दुष्टांच्या कपटजालांतून सुष्टांची सुटका करणं हें तुझं ब्रीद आहे, असं पुराणांतरीं वर्णिलं आहे. तें खरं असेल तर या चांडाळांच्या तावडींतून मला दीन अबलेला मुक्त कर ! दुःखानं गांजलेली, जगानं टाकलेली, निराशेनं ग्रासलेली, मृत्यूच्या दारांत उभी असलेली मी तुला शरण आलें आहें. माझं तारण करणं तुझ्याकडेच आहे !

देवी ! ज्यांना मीं आपलं मन वाहिलं, त्यांच्या लौकिकाची राखरांगोळी करून स्वप्नांतही न घडलेल्या पातकाबद्दल मला कुलटा ठरविण्याचा या चांडाळांनीं घाट घातला आहे ! देवी ! तुझी अनन्यभावानें मीं आज-पर्यंत पूजा केली असेन तर माझी लाज राखण्याकरितां धांवत ये ! व या राक्षसांच्या पापकर्मांचं प्रायश्चित्त यांना भोगायला लाव !

श्रीकृ०:—सभासदहो ! महादेवीचा धांवा करतांनाही आमच्या ताईमहाराज वीररायांना विसरत नाहींत, ही गोष्ट आपल्या लक्षांत आलीच असेल !

वासं०:—अवघ्या जगाला भूषण झालेल्या वीरावर माझं प्रेम असल्याची मला लाज ती कां वाटावी ?

हर०:—कारटे ! विचार करून बोल बरं ! आपल्या निष्कलंक आचरणाबद्दल माझा अभिमान डळमळवूं नकोस !

वासं०:—शुद्ध निर्मळ प्रेमाला हृदयांत जागा देण्यांत बाबा मीं पाप तें काय केलं ? आजवर आपणांपासून मीं तें लपवून ठेवलं हा मात्र माझेकडून मोठा अपराध झाला आहे. आणि या अपराधाबद्दलच जर अग्निप्रवेश करावा लागत असेल तर मी तो मोठ्या आनंदानं करीन ! पण यापेक्षां दुसरं कोणतंही पाप माझेकडून घडलं नाहीं, जगदंबे, हें तूं पहातच आहेस !

हंसा०:—महाराज आणि सभासदहो ! केरळदंडनीतींत सांगितल्या-प्रमाणं साक्षीनं आरोप सिद्ध झालेला आहे हें आपण पाहिलंच ! तेव्हां आतां चारणाकडून नगरांत द्वाही फिरविणं वगैरे व्यवस्थेस आपली अनुज्ञा आहे कीं नाहीं हें आपणांस मीं विचारायला पाहिजे असं नाहीं ! आपली अनुज्ञा आहेच असं धरून मी पुढील व्यवस्थेस लागतों.

[ पद्मरायास खूण करून त्याच्या कानांत कांहीं सांगतो. ]

श्रीकृ०:—हो, शुष्क वादांत वेळ गमावण्यांत अर्थ काय ?

वासं०:—चांडाळा ! निरपराधी स्त्रीचे प्राण वांचण्याकरतां केलेल्या धडपडीला शुष्क वाद म्हणतोस का ? शुद्ध प्रेमाच्या सुंदर मंदिराला व्यभिचाराचं स्मशान ठरवितोस ? प्रेमाच्या सोज्ज्वल ज्योतीला प्रेताचा भडाग्नि

समजतोस ? पाप्या घे ! असाच पापाचा पर्वत आपल्या शिरावर घे ! आणि शेवटीं त्या पापाग्नीच्या साधनानंच आपल्या जीविताची होळी कर !

**श्रीकृ०**:—ताईमहाराज ! संतापून काय उपयोग ? पापाचं परिमार्जन पश्चात्तापानं होत असतं ! संतापानं नाहीं ?

हर०:—खाटका ! तोंड काळं कर अगोदर ! नाहीं तर !

**श्रीकृ०**:—महाराज, आपलं दुःख पाहून माझ्या काळजाला घरं पडत आहेत ! पण न्यायापुढें राजा व रंक, वृद्ध व बाल, स्त्री व पुरुष, या सर्वांना सारखीच मान वांकवावी लागते ! हा विचार मनांत आणून आपलं सांत्वन करून घेतलं पाहिजे ! मीं या वेळीं शत्रुसारखा भासावं, यांत आश्चर्य नाहीं ! तेव्हां मीं आपल्या दृष्टिआड व्हावं हेंच मला ठीक दिसतं !

हर०:—ब्रम्हज्ञान शिकवितो आहे सैतान !

**पद्म०**:—( हात जोडून ) महाराज ! श्रीगोकर्णेश्वरासमोरील पटांगणांत द्वंद्वाला आरंभ होईपर्यंत ताईमहाराजांना आपल्या परवानगीनं कारागृहांत नेऊन ठेवण्याबद्दल न्यायमंत्र्याची या नम्र दासाला आज्ञा झाली आहे, त्याप्रमाणं—

**वासं०**:—( हरदेवाच्या गळ्यास मिठी मारून ) बाबा, तुमच्या या दुःखापुढें मला मरणाचं दुःखही कांहीं वाटत नाहीं ! तुम्हाला दुःख देणारी मी जन्मासच आलें नसतें तर किती बरं होतं ! पण नशिबीं लिहिलेले भोग भोगले पाहिजेत ! मनानं किंवा आचरणानं काडीभरही पातक न घडतां अग्निप्रवेश करावा लागला तर तो न भितां करणं हें वीरकन्येला भूषणच आहे ! सीता, द्रौपदी, दमयंती ह्यांच्यासारख्या महासाध्वींनाही जो छळ टळला नाहीं, तो वासंतिकेच्या वांट्याला आला, ह्यांत विपरीत तें काय झालं ? तेव्हां बाबा, धैर्य धरा ! आणि माझ्या वियोगाचं दुःख सहन करा ! अशावेळीं आपणाला धैर्य द्यायला मी जवळ नाहीं याबद्दल माझ्यावर रागावूं नका ! मी शुद्ध आहें ! मी निरपराधी आहें ! आपली—हरदेव-

रायमहाराजांची कन्या म्हणवून घ्यायला मी लायक आहें, हें मृत्यूची भेट घेतांना माझ्या धैर्यानें मी सिद्ध करीन !

[ जातात. ]

अंक तिसरा समाप्त.



# अंक चवथा.

## प्रवेश पहिला.



स्थळ—अरण्य.

[ वीरराय आणि जयराम प्रवेश करितात. ]

वीर०:— ती जारिणी आहे, हें मीं प्रत्यक्ष या डोळ्यांनीं पाहिलं असून त्या पापिणीचं सारखं चिंतन करीत रहावं; तिची ती बाह्यतः रमणीय मूर्ति कल्पनेपुढें ठेऊन सारखं तिच्याकडे पहात रहावसं वाटावं; इतका देवा! मी मूढ कसा झालों ? जारिणी ! तुझं तें प्रेम, तुझं तें कौमार्य,—तुझी ती शालीनता—सारीं मुलाम्याचीं लेणीं ठरावींत ना ?

जय०:—महाराज ! नुसतं दुःख करीत बसण्यांत काय अर्थ ? दुःखाचं कारण या दासाला कळलं, तर तें हलकं करायचा तरी कांहीं उपाय योजतां येईल ! आणि शिवाय, तें सांगितल्यानं आपल्या जिवाला हलकं वाटेल !

वीर०:—दुःख हलकं व्हायला कांहीं उपाय योजतां येईल म्हणतोस ? जयरामा, तुला एक मुलगा होता नाहीं ?

जय०:—( डोळ्यांना पाणी आणून ) होय महाराज ! होता.

वीर०:—पहा ! तुझ्या त्या देवानं नेलेल्या लाडक्याची आठवण काढतांच, तुझ्या डोळ्याला पाणी आलं ! तुझं हें दुःख हलकं होण्याला कांहीं उपाय योजतां येईल कारे ?

जय०:—नाहीं महाराज !

वीर०:—नाहीं ना ? आणि तें उघडच आहे ! अगदीं काळजाला हात घालणाऱ्या दुःखाचा परिहार कशानं तरी होईल ? दुःखाच्या जखमा भरून येतील, अशी औषधी नंदनवनांत तरी असेल का ?

जय०:—विचारतें याची क्षमा असावी ! आपल्याला दुःख देणारी स्त्री तरी कोण ?

वीर०:—जयराम, ती स्त्री म्हणजे कोणी सामान्य नव्हेरे ? प्रत्यक्ष देवांगनेला लाजवील, असं तिचं स्वरूप आहे ! पण पापिणी ! माझ्या सोज्ज्वल प्रेमाची अशा जारकर्मानं फेड करावीस ना ? प्रत्यक्ष या डोळ्यांनीं पाहिलेला प्रकार जर राजमंडळापुढं मांडला, तर तुझा कसा पण खासा सूड उगविलासं होईल ! पण असा सूड घेणं मला शोभत नाहीं. ती कशीही जारिणी असली, तरी स्त्री आहे. तिचा सूड घेणं म्हणजे नामर्दपणा आहे. शिवाय अग्नीच्या ज्वाळेहूनही भयंकर अशा अनुतापाच्या ज्वाला तिला होरपळून काढल्यावांचून रहाणार नाहींतच ! मला तर आतां दाही दिशा कशा शून्य वाटत आहेत ! मी आतां जाऊं तरी कुठं ? आईबाप सोडून गेले, तेव्हांपासून या वासंतिकेनं मला आपलासा म्हणे पर्यंतचा काळ आतां मला किती सुखाचा वाटतो आहे ! ह्या कुलटेच्या जाळ्यांत न पडतों, तर मी अजूनही केवढा सुखी असतों ! देवा ! यापुढं हें यातनामय जिणं कंठण्यापेक्षां नाहींसं होणं काय वाईट ? जयरामा, नगरांत जाऊन माझी तेवढीं शस्त्रें आणि घोडी घेऊन येशील तर मावळच्या माधवदेवाशीं झुंपणाऱ्या ह्या युद्धांत शेवटची चाकरी बजाऊन वीराला उचित अशी धारातीर्थाची मुक्ति तरी मिळवीन ! जा तर ! तूं येईपर्यंत मी या निर्जन वनांतच आपला काळ कंठीन !

जय०:—महाराज ! या पलीकडच्या खोऱ्यांत गोपाळांचे कांहीं वाडे

आहेत, तिथं मी आपल्याला आधीं नेऊन पोचवतों ! म्हणजे दूध मिळून आपल्या जिवाला थोडी विश्रांति तरी मिळेल ! आणि मग आपल्या आज्ञेप्रमाणं नगरांत जाऊन येतों !

वीर०:—माझी तहान–भूक सगळी मावळून गेलीरे ! पण तूं म्हणतोस तर चल तिकडे ! आणि ते वाडे दिसूं लागतांच परत फिरून नगराकडे जा ! व्याघ्रादि वनचरांनो ! ह्या तुमच्या राज्यांत आजपर्यंत मी तुमचा शत्रु म्हणून शिरून तुम्हांला देमाय धरणीठाय करून सोडण्यांत धन्यता मानीत असे ! पण यापुढं तसं, तसं करीन, असं स्वप्नांतही आणूं नका ! मी तुमचा मित्र तुमचा एक सहचर म्हणून तुमच्यांत येतों आहें ! तुम्ही आतां सुखानं निद्रा घ्या ! तुमचीच क्रूर वृत्ति धारण करून मी तुमच्यांतलाच एक म्हणून तुमच्यांत कांहीं काळ रहायला येतों आहें !

[ जातात. ]



## प्रवेश दुसरा.



**स्थळ**—अरण्याचा दुसरा भाग.

[ श्रीपति व मारुति प्रवेश करितात. ]

श्रीप०:—अशी ह्योच ठिकान ठीक ! बाईला ह्योरं नेऊन तरी काय करायची ? कुठवी झटपट उडवायचीच किनई ! मग हत काय आणि ह्योर काय ? एकदा झटपट उडावली कीं, धनीसाबासी बक्षीसी मागायला कुणाची धास्ती !

मारु०:—ऱ्ये तर ठिकच ! पन बाईला उडवायची कशी ? सुऱ्यांनीं कीं, दोरीनीं !

श्रीप०:—दोरी असून राव सुरी कशापाई ? या दोरीची एकदां बाईला सरी घातली नी आवाळली, कीं त्या पल्याडच्या जाळवंडांत

फेंकून द्यावीन् दुसरं काय ? कोल्ह्या-लांडग्यांना तरी ही त्यांच्या बानंच चमचमीत मेजवानी दिलीसं होईल ! अन् म्या तो वाटमाऱ्याचा धंदा करी, तवां काय करी म्हंगतोस ? घाल सरी नी दे एकाद्या जाळवंडांत फेंकून वाटसरूस्नी नी दुसरं काय ?

**मारु०:**—बाई मेण्यांतन उतरून रानफुल खुडींत येतिया बरं का शिरपतराय !

**श्रीप०:**—अक्षी बिजलीच चमकती हाये जनु !

[ कोकिळा व तिच्या मागून मेणेवाले येतात. ]

**कोकि०:**—ती उषापुरी लांब तरी किती आहे बाबांनो !

**मारु०:**—उषापुरी ? पन् उषापुरीस कोन ल्येकाचा जातोया ?

**श्रीप०:**—आमास्नी तर धनीसावांची सांगी, कीं, बाईला यंपुरीस पोचती करा !

**कोकि०:**—यमपुरी ? यमपुरी ती कुठं ? पण मला तर त्यांनीं उषापुरीस—त्यांच्या गांवीं—जायचं म्हणून सांगितलं !

**मारु०:**—अन् आमास्नी तर यंपुरीस—यमाजीमहाराजांच्या गांवीं न्यायच म्हणून सांगितलं !

**कोकि०:**—यमाजी महाराजांच्या गांवीं ? म्हणजे तुम्ही माझा जीव घेणार कीं काय ?

**मारु०:**—आतां कसं ह्येरलं ?

**कोकि०:**—म्हणजे खरंच तुम्ही मला मारणार कीं काय ?

**श्रीप०:**—बाई ! आमी खाल्या अन्नाचं चाकूर ! तुमाला बिगीबिगी ठार करावं म्हणूनश्यान आमाला हुकूम ! त्याला आमी काय करावं ?

**कोकि०:**—चोरांनो ! माझा प्राण घ्यावा म्हणून श्रीकृष्णरायांनीं तुम्हांला सांगितलं ? अन् हें मी खरं मानीन असं समजतां ? हे दागिने पाहून तोंडाला पाणी सुटून त्यासाठीं माझा प्राण घेऊं पहातां, हे कां मला कळत नाहीं ? पण तुमच्या तावडींत मी सांपडली आहें, तेव्हां काय कराल तें खरं ! बाबांनो ! हे दागिने मी तुम्हाला काढून देतें ! अन् मला आल्या वाटेनं जाऊं दिलीत, तर श्रीकृष्णरायाजवळ एक चकार

शब्द काढणार नाहीं, शपथ घेऊन मी तुम्हांला सांगतें! पदर पसरतें, माझा प्राण फुकट कां घेतां?

[ दागिने काढून मारुतीजवळ देते. ]

श्रीप०:—थूं तिच्या डागिण्यावर! या खिडुक-मिडुकापाई आमी खाटीक बनूं, असं वाटतं तुमास्नी? धन्याच्या हुकुमाबाहेर आमच्या बालाबी कांहीं कळत नाहीं!

कोकि०:—बाबांनो, तुमच्या पाया पडतें! मला अबलेला मारून पापाचे धनी कां होतां? कृष्णरायांनीं तुम्हांला मला मारायला सांगितलं, म्हणून म्हणतां, पण मीं त्यांचा असा अपराध तरी कोणता केला आहे, तर मला त्यांनीं देहान्त शासन द्यावं?

श्रीप०:—बाई हा कागुद वाच, म्हंजे आमी धन्याच्या हुकुमापरमानं हे वंगाळ काम करतो, का तुझ्या डागिण्यापाई करतो, हें तुलाच कळल.

[ पत्र देतो. ]

कोकि०:—( पत्र उघडून वाचते ) "तुला माहीत असलेल्या गोष्टीची वाच्यता होऊं नये, याकरितां तुझं तोंड कायमचें बंद करणें हें माझें काम आहे, आणि त्याला तुझ्या मरणावांचून दुसरा मार्ग नाहीं!" मांगा कसाबा! वेड्याप्रेमानं आंधळी होऊन तुझ्या शब्दावर विश्वास ठेवला नी ताईमहाराजासारख्या साध्वीचा छळ करण्याचं महापातक करायला तयार झालें याचा मोबदला म्हणून तूं मला मृत्यूची शिक्षा देत आहेस, पण माझ्यापेक्षां सहस्रपट अधिक भयंकर अशा तुझ्या पातकाबद्दल देव तुला घोर शिक्षा केल्यावांचून कधींही रहाणार नाहीं!

श्रीप०:—मारत्या! बघतोस काय मुर्दाडावानी! फेंक दोर!

कोकि०:—कोणी धांवा हो धांवा!

[ लांडग्यांनो हा तुमचा काळ आला, असें ओरडत वीरराय येतो, त्याला पहातांच श्रीपती, मारुती व मेणेवाले पळून जातात. ]

वीर०:—( कोकिळा बेशुद्ध पडली आहे तिच्याजवळ येऊन ) अरेरे! दुष्टांनीं अखेरीस इचा प्राण घेतलाच! अरेरे! ही तर वासंतिकेची पट्टदासी



कोकिळा पत्र उघडून वाचते.

पान ६० अंक चवथा.

कोकिळा ! असल्या सुंदर व सकुमार तरुणीचा खून करणाऱ्या ह्या मांगांचीं हृदयें खरोखरंच पाषाणाहूनही कठोर असलीं पाहिजेत ! असल्या रूपयौवनसंपन्न शरीरांतील मालविलेला प्राणदीप जर मला पुन्हा लावतां येता, तर किती बरं होतं ! वा ! पण हिनं डोळे उघडले !

कोकि०:—( डोळे उघडून ) आई !—

वीर०:—कोकिले ! मला तूं ओळखलंस ?

कोकि०:—( सभोंवार पाहून ) मी इथं कशी आलें ?

वीर०:—भिऊं नकोस !

कोकि०:—ते मांग परत नाहींना येणार? आलेच तर तुम्ही माझं रक्षण करालना ?

वीर०:—तुला आतां भिण्याचं कारण नाहीं ! मी जवळ असल्यावर एक नाहीं एक सहस्र नरपशु तुझ्यावर चालून आले, तरी त्यांचा समाचार घेण्याचं सामर्थ्य देवानं या मनगटांत ठेवलं आहे. पण तूं त्यांच्या तावडींत कशी सांपडलीस ?

कोकि०:—देवानं मला योग्य शासन केलं ! वीरराय ! मीं आपल्याला ओळखलं ! मला क्षमा करा ! मी आपला थोर अपराध केला आहे !

वीर०:—माझा अपराध ? हो ! तूं त्या सटवीची—त्या कुलटेची सखी नाहीं का ? मग तुझा स्पर्शही मला अपवित्र वाटावा; पण ह्या करुणास्पद स्थितींत तुला पाहिल्यानं मी तें सगळं विसरून गेलों होतों !

कोकि०:—ताईमहाराज कुलटा नाहींत. आपण निखालस फसला आहांत ! मला खोटं सांगून काय मिळणार !

वीर०:—काय ? ह्या डोळ्यांनीं, तिनं आपल्या जाराला कवटाळलेलं मीं पाहिलं ! आणि मीं फसलों म्हणतेस ?

कोकि०:—खिडकींत ताईमहाराजच उभ्या होत्या असं आपल्याला वाटलं, यांतच आपण फसलां !

वीर०:—अग ! मी का आंधळा आहें ? मला का डोळे नाहींत ?

कोकि०:—ताईमहाराज ! मीं आपला केवढा भयंकर अपराध केला

आहे ! तुम्ही निरपराधी–साध्वी आहांत असं म्हणण्याची या अपराधी पापिणीची योग्यता तरी आहे का ?

**वीर०:**—तूं तिची दासी, तूं तिची तरफदारी करतेस; पण–मला कां तूं तिच्या पावित्र्याच्या गोष्टी सांगणार ? प्रत्यक्ष मी या डोळ्यांनीं तिला खिडकींत उभी असतांना पाहिली !

**कोकि०:**—ही–ही पापिणीच त्या वेळीं ताईमहाराजांसारखी सजून खिडकींत उभी होती ! त्या राक्षसावरील–त्या श्रीकृष्णरायावरील आंधळ्या प्रेमानं वेडी होऊन मींच त्यांच्या सांगण्यानं आपल्या डोळ्यांत धूळ टाकली, आणि अक्षय नरकवासाचं साधन करून ठेवलं ! ताईमहाराज तर तेव्हां सुखाची झोंप घेत होत्या ! वीरराय माझा अपराध पोटांत घालाल काय ?

**वीर०:**—काय म्हणतेस ? तुलाच वासंतिकेसारखी सजवून खिडकींत उभी रहायला त्या नराधमानं सांगितलं होतं ? आणखी एकच गोष्ट विचारतो ! वासंतिकेचं त्याला आलेलं पत्र—

**कोके०:**—तें पत्र त्या सैतानानंच आपल्या हातानं बनावट तयार केलं होतं ! त्यांतलं अक्षर ताईमहाराजांच्या अक्षरासारखंच वठलं आहे कीं कसं, हें पहाण्याकारितां त्यानंच मला तें दाखविलं होतं !

**वीर०:**—आणि वासंतिकेची ती तसबीर त्याजवळ कशी आली ?

**कोकि०:**—या पापिणीनं ती ताईमहाराजांच्या पेटींतून चोरून आणून त्या राक्षसाजवळ दिली ! वीरराय मला क्षमा करा !

**वीर०:**—मूढा वीरराया ! आणि याकरितांच तूं त्या पावित्र्य-मूर्तीला पापिणी मानलीस ! याकरितां जिवावर उदार होऊन आत्महत्या करावयास प्रवृत्त झालास ! हरामखोरा ! थांब याजबद्दल तुझा सूडच घेतों !

**कोकि०:**— ती महादेवीच त्याचा सूड घेईल ! राक्षसानं माझ्या प्रेमाची फेड अशी करावी ना ? गुप्त गोष्टी मी जगाला सांगेन म्हणून माझा प्राण घ्यायला त्यानं तयार व्हावं ना ?

**वीर०:**—काय ? हे मांग त्याचेच मारेकरी कीं काय ?

**कोकि०:**—होय ? उषापुरीस—आपल्या गांवीं—चार दिवस रहा-

यला पाठविण्याच्या मिषानं त्या सैतानानंच मला या खाटकांच्या स्वाधीन केलं ! आणि इथवर मेण्यांत आणून मला ते ठार मारणार तोंच आपण माझ्या हांकेला धांवला ! हें पत्र पहा ! त्या राक्षसानंच हें लिहिलं आहे आणि या मांगांनीं मला इथंच वाचायला दिलं !

वीर०:—( पत्र वाचून ) सैताना !

कोकि०:—तुम्हीं मला क्षमा केली आहे असं म्हणा !

वीर०:—कोकिळे ! तुझ्या सर्व अपराधांची मीं तुला क्षमा केली आहे ! देवही तुला क्षमा करील !

[ जयराम भाला व झगा घेऊन येतो. ]

जय०:—धनीसाहेब ! ही वेळ निघून गेली तर जन्मभर दुःखावांचून आपल्या कपाळीं कांहीं नाहीं ! ताईमहाराजांना जारिणी ठरवून उद्यां सूर्योदयाबरोबर अग्निप्रवेश करायला लावणार ! धांवा ! धांवा !

वीर०:—काय ? ते चांडाळ आपल्या राक्षसी क्षुधेला शांत करण्याकरितां प्रत्यक्ष माझ्या लाडकीची आहुति घेत आहेत ! दे-दे-तो व्याघ्रध्वज ! दे तें रक्तवस्त्र ! वासंतिके ! लाडके ! हा तुझा वीरराय ! तुझ्या शत्रूचा बळी घेऊन तुझी मुक्तता करण्याकरितां एका क्षणांत आलाच पहा. सूर्यनारायणा ! अशीच कांहीं वेळ निद्रा घे ! या श्रीकृष्णरायाच्या सैतानी आरोळीनं आपल्या गाढ निद्रेंतून जागा झालास तर आगीच्या ज्वाळेनं होरपळणाऱ्या एका निरपराधी पतिव्रतेच्या शापानं सर्व दिवसभर मात्र तुला जळावं लागेल ! चल जयरामा ! कोकिळे चल ! या पलीकडे गांवांत घोडे घेऊं आणि राजधानीकडे दौड करूं ?

[ जातात. ]



# प्रवेश तिसरा.



**स्थळ**—राजमार्ग.

[ बलिभद्र आणि पद्मराय प्रवेश करितात. ]

बाल०:—पण डाव फसला आणि अंगावर आला तर कसं होईल ?

पद्म०:—अंगावर आला, आणि त्याकरितां मला प्रत्यक्ष देहांत शासन मिळालं, तरीही तें मी मोठ्या आनंदानं सोशीन ! मला अन्नाला लावून जिनं माझ्या मुलां–लेकरांना हे सुखाचे दिवस दाखविले, त्या पुण्यव्रत साध्वीला या प्राणांतक अरिष्टांतून सोडवायला कचरणं–याहून घोर कृतघ्नपणा तो कोणता ? यश आलंच तर उपकारांची अंशतः फेड झाली असं तरी होईल ! अपयशच आलं आणि त्याकरितां देहांत शासनही भोगावं लागलं तर आपलं पवित्र कर्तव्य केल्याचं तरी समाधान वाटेल.

बलि०:—खरंच आहे ! पण अशा ह्या कारागृहांतून आणि तींही दिवसा ढवळ्या आपण ताईमहाराजांची मुक्तता तरी कशी करणार ?

पद्म०:—बलीभद्रा ! या कार्यांत तुझं साहाय्य मला खास मिळेल ना ?

बलि०:—माझं साहाय्य ! खास मिळेल, हें मीं सांगायला कां पाहिजे ?

पद्म०:—असं बघ; महाराज अजारी असल्यामुळं वासंतिकाताईसाहेबांना त्यांना भेटण्याची परवानगी दिली आहे, त्यांच्या बरोबर पहाऱ्याला माझं पथकच नेमलं आहे ! ताईमहाराज त्यांच्या भेटीला गेल्या ह्मणजे त्यांची तिथून मुक्तता करूं ! सर्व पथकाची या कार्याला पूर्ण सहानुभूतिही आहे ! माझ्या एकनिष्ठ सैनिकांच्या मनांत आल्यावर अडचण कुठली ? द्वंद्वाची वेळ येण्यापूर्वीच देतो हरहर महादेव उडवून !

बालि०:—इतकी तयारी असल्यावर सिद्धीची काळजीच नको.

गोकर्णेश्वर करो आणि वासंतिकाताईमहाराज या दुष्ट दंडनीतीच्या तावडींतून सुटोत ! प्रत्यक्ष राजकन्या ! आणि तिच्यावरही असा प्रसंग यावा ना ! हर हर ! दैवाचे खेळ हे असे असतात ! स्वप्नस्वप्नांतरींही ज्याची कल्पना नाहीं अशा या प्रसंगीं बिचारीच्या मनाची काय स्थिति झाली असेल ?

**पद्म०**:—तुला त्या साध्वीच्या धैर्याची मुळींच कल्पना नाहीं ! स्वत: प्रत्यक्ष मृत्यूच्या दारांत उभी असतां आपलं सर्व दुःख गिळून टाकून ती महाराजांचं सांत्वन करते आहे !—बलिभद्रा ! वेळ जवळ येत चालली ! आतां आपल्या तयारीला लागलंच पाहिजे !—देवाधिदेवा ! आम्हां दुर्बलांना या कार्यांत साहाय्य करून त्या साध्वीची मुक्तता करण्याचं पुण्य आमच्या पदरीं पडूं दे !

[ जातात. ]



## प्रवेश चवथा.



**स्थळ**—श्रीकृष्णरायाचा महाल.

[ श्रीकृष्णराय येतो. ]

श्रीकृ०:—( स्वगत ) हा श्रीपति सांगतो त्याप्रमाणं त्यानं तिचं पुरं काम केलं असलं तर ठीकच ! पण तसं नसलंज, आणि तिला आपली कर्मकथा वीररायाजवळ सांगण्याइतका जरी अवधि मिळाला असला, तर मात्र कठिण ! तो वीरराय माझ्या नरडीचा घोट घ्यायला तीरासारखा धावून येईल ! पण त्यालाही एक तोड काढून ठेवलीच आहे ! नगरांत शिरतांनाच वाटेवर असलेल्या झाडींत दोन बेरडांना दबा धरून बसवून ठेवलेच आहेत !

वीरराय तिथं येतांच त्याच्यावर ते एकदम तुटून पडले, म्हणजे काळजीच नको ! मग माझा डाव खास साधला, असं म्हणायला कांहीं हरकत नाहीं. ( रुद्राक्षराय येतो. ) कसं काय ? वेळ तर येऊन ठेपली ! तिच्या वतीनं द्वंद्वाला कुणी वीर तयार आहे का ?

रुद्रा०:—वीर आणि आपल्याशीं लढायला ? शपथेला सुद्धां कुणी नाहीं ! तिच्याबद्दल नुसते हळहळणारे मात्र पुष्कळ; पण आपल्याशीं द्वंद्व करायला एकाचीही छाती होत नाहीं ! आणि शिवाय, साक्षी पुराव्यानिशीं जें जारकर्म सिद्ध झालं आहे, त्याचा कैवार घेऊन आपला प्राण गमवायला तयार होणार तरी कोण ? तें कांहीं नाहीं ! आज आपल्या मार्गातली धोंड नाहींशी होणार खास !

श्रीकृ०:— ती तर आज मरणारच ! आणि तिच्या दुःखानं तो म्हातारा आजारी पडलाच आहे, तो लवकर राम म्हणणार ! पण अजून एक भीति उरली आहे; ती कांहीं चैन पडूं देत नाहीं !

रुद्रा०:—आतां, आणि भीति ? मला तर कसली दिसत नाहीं !— वीररायाची कीं काय ?

श्रीकृ०:—होय त्याच सैतानाची ! पण माझ्या बेरडांनीं बहुत करून एव्हांना त्याची नरकपुरीस रवानगी केली असेल ! पण त्यांच्या तावडींतून जर तो निसटला ! छत् ! तें शक्यच नाहीं ! मला इतकी भीति कां वाटावी ? चल जाऊंदे ! ह्या भीतीला भीक घालतां कामा नये ! वेळ झाली म्हणजे माझी द्वंद्वाचीं आयुधें—खड्ग आणि ढाल— तेवढीं पुढं जाऊं द्या ! त्यांचं प्रयोजन पडणार नाहीं हें दिसतंच आहे म्हणा ! ( एक चाकर लखोटा आणून देतो. ) आपले हेरांचे मुकुटमणि खंडेराय त्यांचंच हें अक्षर. ( लखोटा फोडून वाचतो. ) घात झाला, तिला सोडविण्याचा बेत दिसतो आहे ! पहारेकरी, सैनिक फितूर झाले आहेत, धांव ! आधीं न्यायमूर्ति हंसाचार्यांकडे जाऊन त्यांना कळीव कीं विलंब न लावतां दुसरी एक सैनिकांची तुकडी पहाऱ्याला लावून द्या ! आणि फितुऱ्यांना तिथून आधीं हालवा ! धांव ! एका क्षणाचा विलंब झाला कीं, सगळी इमारत ढासळलीच ! महाराज

अजारी असल्यामुळें वासंतिका राजमहालांत गेली आहे ! महाराज कदाचित् आपला शेवटचा अधिकार चालवून वासंतिकेला सोडून देतील. आपण स्वत: तिथं हजर राहून महाराजांना भलता सलता हुकूम द्यायला सवडच देऊं नये !

[ जातात. ]



## प्रवेश पांचवा.



**स्थळ**—राजमंदिर.

[ हरदेवराय मंचकावर पडला आहे व वासंतिका बसली आहे. ]

हर०:—गोकर्णेश्वरा ! किती माझं सत्त्व पहातोस ! बाळे, तुझ्यावर आलेला आळ म्हणजे माझ्या हृदयाला बसलेला जबरदस्त धक्काच आहे. ह्या धक्क्यानं मला मृत्यूच्या दरवाजांत आणून ठेवलं आहे, पण अद्याप प्राण जात नाहींत, अजून डोळे कसे मिटत नाहींत !

वासं०:—बाबा ! असं दुःख करून कसं चालेल ! डोळे किती खोल गेले आहेत ! बाबा, माझ्याकडं एकदां प्रेमदृष्टीनं पहा !

हर०:—नको ! नको ! तुझ्याकडं पाहिलं कीं, काळीज फुटून जातं ! या माझ्या मृत्यूच्या स्थितींत तुझी माझी भेट झाली हेंच माझं भाग्य ! काय करूं रे ! कुठून या कायद्याकडं माझं दुर्लक्ष झालं ! दुर्लक्षाबद्दल प्रियकन्येच्या प्राणाचं मोल मी देत आहें; तुला पाहतांच —देवा, सोडीव या यातनांतून !

वासं०:—बाबा ! मी मरणाला मुळींच भीत नाहीं ! मरणाला मीं काय म्हणून भ्यावं ? तुमची ही अवस्था पाहून मात्र जिवाला जे क्लेश होत आहेत ते सोसवत नाहींत ! पण बाबा असं दुःख करून कसं होईल.

त्या देवलोकीं आपण भेटणार नाहीं का ! मग तिथं आपली ताटातूट कोण करील !

हर०:—बाळे ! तूं माझं जीवितसर्वस्व ! तूं गेल्यावर माझं काय राहिलं ? मला म्हाताऱ्याला मागं राहून तरी काय करायचं ? बाळे, आपण त्या देवाधिदेवाकडे दाद मागायला बरोबरच जाऊं !

वासं०:—नाहीं ! बाबा असं करून कसं चालेल ? मग माझ्या नांवावरील कलंक धुवून कोण काढील ? त्या सैतानाला त्याच्या पापाचं शासन कोण करील ? त्याला शासन झाल्यावांचून मला स्वर्गांत शांति कशी मिळेल ?

हर०:—गोकर्णेश्वरा ! माझ्या या निष्कलंक बाळेला जाळणाऱ्या त्या नराधमाला माझ्या दुःखाच्या सहस्रपट अशा ज्वालेनं पोळून टाक ! भीति, अविश्वास आणि दीर्घद्वेष हीं पिशाचें त्याला सतावून सोडूं देत ! आराम आणि आनंद हीं त्याला स्वप्नांतही दुर्मिळ कर ! केरळदेशाचें पुण्यश्लोक राज्यपद त्याला यमाच्या तापलेल्या लोहासनासारखं भयंकर होऊं दे. विश्वासघात आणि रक्तपात हीं त्याला निद्रेंतही दिसूं देत ! आणि प्रजेच्या तळतळाटानं आणि शापानं अखेरीस त्याची होळी कर !

[ बेशुद्ध होतो. ]

वासं०:—आई जगदंबे ! दुःखानं आणि संतापानं भ्रमलेल्या बाबांच्या मनाला शांति दे. ( बाहेर हरहर महादेव ऐकूं येतो. ) पण ही कसली गडबड ?

[ हातीं खड्ग घेतलेला पद्मराय येतो. ]

पद्म०:—( हात जोडून ) ताईमहाराज ! आपली मुक्तता करण्याकरितां मी इथं आलों आहें. आपल्या अगणित उपकारांचं या दासावर जें ओझं झालं आहे; तें हलकं व्हावं एवढ्याचकरितां हें साहस केलं आहे ! ताईमहाराज ! सैन्यांतील सर्व तरुण वीर बाहेर जमले आहेत. त्यांच्या साहाय्यानं आपल्याला नगराबाहेर सुरक्षित स्थळीं नेण्यास काडीचीही अडचण आड येणार नाहीं. चलावं, वेळ गमाऊं नये, हीच विनंति आहे !



पद्म०:—ताई महाराज ! सैन्यांतील सर्व तरुण वीर बाहेर जमले आहेत. [ पान ६८.

वासं०:—पद्मराय, तें सगळं मी कबूल करतें; पण येथून पळून गेल्यानं माझ्या नांवावरचा काळिमा का धुवून निघेल ? ज्या कृष्णसर्पानं माझ्या काळजालाच दंश केला आहे, त्याचं कृष्णकारस्थान का अशानं जगापुढं येईल ? पळून गेल्यानं मृत्यु टळेल ! पण माझं निष्कलंक नांव का त्यानं परत मिळेल ? उलट त्यानं माझं नांव अधिकच कलंकित नाहीं का होणार ?

पद्म०:—ताईमहाराज, देवानं दिलेली ही सोन्यासारखी संधि कां दवडायची ? आणि दैवानं दिलेलं हें अलौकिक सौंदर्य, तारुण्य आणि सद्‍गुण हीं आपण होऊन कां अग्नीला अर्पण करायची ? हरहर ! याहून भयंकर तें काय ?

वासं०:—अग्निप्रवेश करणं हें कितीही जरी भयंकर असलं, तरी मला आतां त्याची मुळींच भीति राहिली नाहीं, याहूनही भयंकर असं दिव्य मी आधींच सहन करीत नाहीं का ? सगळ्या जगाकडून कुलटा म्हणवून घेणं याहून भयंकर तें काय असणार ? हें असलं कुलटेचं जिणं आणखी कांहीं काळ कंठण्यापेक्षां अग्निकाष्ठ भक्षण करून एकदम प्राण देणं, हें किती तरी सुखाचं !

पद्म०:—ताईमहाराज ! आपल्या उच्च शीलाला साजे असेच आपले विचार आहेत ! पण मी हात जोडतों, साष्टांग प्रणिपात करतों, या वेळीं हे विचार बाजूला ठेऊन माझ्या विनंतीला मान द्या. व या भयंकर मृत्युमुखांतून आपली सुटका करून घ्या ! ताईमहाराज, आतां फक्त एकच क्षण आपल्या ताब्यांत आहे, त्याचा उपयोग करून घेऊन ह्या केरळ देशावर राज्य करण्यास आपण उदंड जगावं हीच या नम्र दासाची आपल्या पायाजवळ विनंति आहे !

वासं०:—नाहीं नाहीं ! माझा निश्चय कांहीं ढळायचा नाहीं ! त्यांतून अशा स्थितींत बाबांना टाकून जाणं, हें तर अशक्यच आहे.

श्रीकृ०:—( बाहेरून ) फोडा दरवाजे ! आणि आड येतील त्यांचे मुडदे पाडा !

**वासं०**:—हा पहा तुमचा सगळाच घाट ढासळला !

[ कृष्णराय व सैनिक येतात. ]

**पद्म०**:—घात झाला ! प्रभूची इच्छा ! माझ्या अन्नदात्यालाच तुझी सेवा नको, तर मला तरी तुझ्याशीं काय करायचं आहे ?

[ खड्ग फेंकून देतो. ]

**श्रीकृ०**:—ह्या विश्वासघातक्याच्या मुसक्या बांधा आणि याला घेऊन चला येथून ! ( पद्मरायास नेतात ) महाराजांना काय झालं आहे ?

**वासं०**:—कृष्णसर्पा ! तुझ्या दंशाच्या वेदना सहन न होऊन ते बेशुद्ध पडले आहेत. ते शुद्धीवर येण्यापूर्वीं तूं येथून काळं कर ! नाहींतर पहारेकऱ्याला हाक मारून तुझं तोंड एकदम बंद करीन !

**श्रीकृ०**:—कुणाचं तोंड बंद होणार आहे तें समजेलच आतां ! वासंतिके ! तूं बंदिवान आहेस ही गोष्ट विसरूं नकोस. तुझ्यावर आलेल्या आरोपांतून तुझी मुक्तता करणं आतां प्रत्यक्ष महाराजांनाही शक्य नाहीं. तुझा प्राणप्रिय वीरराय तुला या संकटसमयीं आपला हात देईल, अशीही आशा करायला जागा नाहीं. तुझ्या वतीनं माझ्याशीं द्वंद्व करून तुझ्या सुटकेचं पाप माथीं घेईल, असा कोणीही वीर या केरळदेशांत वास करीत नाहीं; मग शब्दाच्या धमकावणीनं माझं तोंड बंद करण्याच्या गोष्टी सांगून व्यर्थ शीण का घेतेस ? माझं तोंड एकाच उपायानं बंद केलं असतंस, आणि तेंही तुझ्या या सुंदर ओष्ठांनीं माझ्या तोंडाला कुलूप घालून ! पण ती वेळ आतां निघून गेली !

**वासं०**:—राक्षसा ! असले घाणेरडे शब्द मुखांतून काढतांना तुझी जिव्हा झडून कां जात नाहीं ? असले पापी विचार, प्रेमानं वहाणारं तुझं हृदय कुजून कां जात नाहीं ? असल्या अधम राक्षसाला आपल्या पाठीवर धिंगाणा घालूं देणारी ही भूमि भंगून कां जात नाहीं ? मी तुझ्या मागणीचा धिक्कार केला म्हणून खवळून जाऊन आपल्या विषारी फूत्कारानं माझ्या जड देहाची जरी तूं होळी केलीस, तरी प्रेमजलानं तुडुंब भरलेल्या माझ्या आत्मदेहाला स्पर्श करण्याची पापी शक्ति केरळ देशांतल्याच नव्हे, तर जगांतल्या कोणत्याही मानवी प्राण्याच्या अंगीं नाहीं !



श्रीकृष्ण०:—वासंतिके ! तूं बंदिवान आहेस ही गोष्ट विसरूं नकोस.

[ पान ७०.

श्रीकृ०:—जडदेह आणि आत्मदेह हा सगळा तुझा भ्रम आहे! आत्मदेहाच्या आभासाच्या रडकथा सांगून अशक्त प्राणी नेहमीं आपला पराक्रम गाजवीत असतात! मला तुझ्या आत्मदेहाची भीति नाहीं! आत्मदेहाच्या अस्तित्वाची जाणीव ठेऊन परमेश्वरी न्यायाची भीति माझ्या हृदयांत खुपसून दयेचा पाझर फोडण्याचे व्यर्थ श्रम कां घेतेस? मूर्ख पोरी जागी हो! जागी हो! या स्वप्नांमधून जागी हो! अग्निनारायणावांचून तुझ्याशीं विवाह लावणारा प्रतापी वीर आतां तुझ्या वाट्याला येत नाहीं!

वासं०:—प्रेमळ पित्याप्रमाणं सर्व अपराध पोटांत घालून सर्व जीवमात्रावर समान प्रेम ठेवणाऱ्या अग्निदेवासंबंधानं तुझी पापी कल्पना तुझ्यापाशींच राहूं दे! तुझ्या पापी दर्शनाचा संपर्क मुद्धां होऊं नये, म्हणून त्या करुणाकर परमेश्वरानं बावांची स्मृति या वेळीं नष्ट केली आहे! जा, जा, ते सावध होऊन त्यांच्या संतापाग्नीनं तुझी रक्षा होण्यापूर्वी निघून जा!

श्रीकृ०:—वासंतिके! संतापानं जळून जाण्याच्या कल्पना काव्यांत शोभतात! प्रत्यक्षांत आढळून येत नाहींत! मी इथं जळून जाण्याकरितां आलों नाहीं तर तुला जाळण्यासाठीं घेऊन जाण्याकरितां आलों आहें! महाराज सावध होऊन आपला अधिकार वजावून तुला मुक्त करण्यापूर्वींच तुझी जीवनयात्रा मला संपविली पाहिजे! ऊठ, ऊठ आतां आणि मुकाट्यानं माझ्या पुढं चल!

वासं०:—तुझ्यासारख्या राक्षसी मनोवृत्ति अशा स्थितींत घात करायलाही कमी करणार नाहींत! नाहीं मी त्यांना टाकून येत!

श्रीकृ०:—तुझ्या मर्जीवर आतां ती गोष्ट नाहीं! महाराजांचा घात करून प्रजेच्या अप्रीतीचा पर्वत आपल्या माथ्यावर घेईल इतका मूर्ख हा कृष्णराय नाहीं. वासंतिके! महाराजांच्या जीविताबद्दलची तुझी शंका व्यर्थ आहे!

वासं०:—तुझ्यासारख्या काळकपटी मांगाच्या वचनावर कोण विश्वास ठेवील? नाहीं! मी इथून मुळींच हलणार नाहीं!

**श्रीकृ०**:—हलत नाहींस ? तुला इथून हलविणं मोठंसं काठिण नाहीं ! कोण आहेरे ? ( दोन नोकर येतात ) पकडा हिला आणि चला घेऊन गोकर्णेश्वराकडे ! ( वासंतिकेस धरूं लागतात. )

**वासं०**:—इतकी तसदी घेण्याची कांहीं जरुरी नाहीं ! बाबांचं रक्षण करणारा तो सर्वसाक्षी गोकर्णेश्वर आहे ! खबरदार ! माझ्या अंगाला हात लावूं नका. माझ्या अंगाला स्पर्श केलात तर निष्पाप कुमारीचं कौमार्य किती प्रखर असतं, याचा अनुभव तुम्हांला आल्यावांचून राहणार नाहीं !

[ जातात.]





**श्रीकृष्ण**:—पकडा हिला आणि चला घेऊन गोकर्णेश्वराकडे! पान ७२ अंक चवथा.

# अंक पांचवा.

## प्रवेश पहिला.



**स्थळ**—राजमंदिर.

[ हरदेवराय पलंगावर उठून बसतो. ]

हर०:—( स्वगत ) जागं झाल्याबरोबर माझीं गात्रं इतकीं गळून गेलेलीं कां बरं वाटतात? किती रात्र असेल बरं? पहाट झाली असावी. काय तें स्वप्न! त्या स्वप्नाप्रमाणं जर सर्व गोष्टी घडून येतील तर सुखाच्या परमावधीचाच लाभ मला मिळणार आहे! वासंतिकेला वाघाच्या जबड्यांतून सोडविणारा वीरराय या शासनाच्या व्याघ्रमुखांतूनही तिला सोडवील का? पण स्वप्न उलट होतं असाही कांहीं अनुभव सांगतात; तसं जर झालं तर? नको! तो विचार नको—मला भ्रम तर नाहीं ना झाला? वासंतिका मला रात्रीं भेटायला आली होती; मग ती इथून गेली कशी? नाहीं! हो मला आत्तां आठवलं! वासंतिका माझ्याशीं बोलत होती. तिच्या करुण वाणीनं मी भडकून गेलों! आणि त्या संतापानं माझी स्मृति लयाला नेऊन मला बेशुद्ध केलं! कोण आहेरे बाहेर? [ एक सरदार येतो. ]

सर०:—काय आज्ञा आहे महाराज?

हर०:—कायरे उजडायला किती अवकाश आहे?

सर०:—दोन घटकांनीं दिवस उगवेल महाराज!

हर०:—वासंतिका इथून केव्हां गेली?

सर०:—त्या जात नव्हत्या, पण श्रीकृष्णरायांनीं त्यांना नेल्या सरकार!

हर०:—बरं तूं जा. ( सरदार जातो. ) वासंतिकेच्या प्राणावरील संकट अजून दूर करणं माझ्या हातांत आहे का? मी राजा आहें, आणि

राजाला आपल्या दयेचा अधिकार गाजवून महा भयंकर अपराधीही मोकळा करतां येतो.—या वेळीं जर मीं आपल्या ह्या अधिकाराचा अंमल केला तर हा हरदेवराय आपल्या वत्सलतेनं अंध होऊन पक्षपात करीत आहे असा दोष माझ्यावर यायचा संभव आहे. अरेरे ! माझा हा अधिकार या वेळीं चालवायला मीं असमर्थ व्हावं ना ? कोण आहेरे तिकडे ? ( सरदार येतो ) कायरे, वीररायांचा कांहीं पत्ता आहे काय ?

सर० :—नाहीं महाराज, त्यांची कांहींच खबर नाहीं !

हर० :—बरं, वासंतिकेच्या पक्षानं कोणी वीर द्वंद्वाला तयार झाला आहे का ?

सर० :—नाहीं महाराज !

हर० :—बरं, तूं जा. ( सरदार जातो. ) वासंतिकेच्या निरपराधीपणाची खात्री असलेला कोणीही वीर या श्रीकृष्णरायाशीं द्वंद्वाकरितां पुढं सरसावूं नये अं ! ज्या वासंतिकेनं युद्धप्रसंगीं सदय अंत:करणानं अनेक वीरांची स्वत:च्या हातांनीं शुश्रूषा करून त्यांना जीवदान दिलं, त्या वीरांपैकीं एकही वीर वासंतिकेच्या प्राणाकरितां प्राण द्यायला सज्ज होऊं नये अं ? धिक्कार ! धिक्कार असो तुमच्या कृतघ्नतेला ! जरी मी वृद्ध झालों आहें, तरी कृतज्ञतेची विद्युल्लता माझ्या मनांत चमकल्याबरोबर माझ्या गलित स्नायूंतही भीमशक्तीचा संचार झाला असता; वार्धक्याच्या अंमलानं कंप पावणारे हातपाय वीरश्रीनं स्फुरण पावूं लागले असते; आणि शरीराचा तोल संभाळण्याकरितां सदोदित हातांत राहणाऱ्या काठीचं खड्ग बनून त्या श्रीकृष्णरायापुढं त्याचा काळ म्हणून उभा राहिलों असतों. पण मी स्वत:च जर तिचा वीर बनलों तर ? मी राजा आहें. कुणाही वीराशीं द्वंद्व करणं, मला योग्य आहे का ? राजा या दृष्टीनं हरदेवरायाचा दर्जा मोठा असेल ! पण एक वीर या नात्यानं हरदेवरायाला कुणाशींही लढतां येईल ! पण मी राजा आहें असं जर दिसलं तर माझ्याशीं कोण युद्ध करणार ? मला गुप्त वेषानं गेलं पाहिजे. सरदार ? ( सरदार येतो. ) इकडे ये. तुझं खड्ग वजनदार आहे कांरे ?

सर० :—महाराज, माझ्यासारख्या तरुणाला झेपेल इतकं वजनदार आहे !

हर०:—आण पाहूं इकडे. (सरदार तरवार देतो ती घेऊन) माझ्या तरुणपणीं याच्या दुप्पट वजनाचं खड्ग माझ्या हातांत असे. मी इतका वृद्ध आहें, तरी पण हें तुझं खड्ग मला तर अगदीं हलकं वाटतं. बरं माझं खड्ग कुठं आहे ?

सर०:—या इथंच आहे महाराज ! हे घ्यावं. [ तरवार देतो. ]

हर०:—आतां जरा बरं वाटतं ! तुझा हा डगला दे पाहूं !

सर०:—हा घ्यावा महाराज !

सर०:—याला तोंडावरचा पडदा आहे कांरे ?

सर०:—आहे महाराज ! हा पहा !

हर०:—माझ्या हा जरा अंगांत चढव पाहूं !

सर०:—महाराज !—

हर०:—सरदार, थट्टा नाहीं. चढवा लवकर माझ्या अंगांत. हं अस्सं ! बरं, पहाऱ्यावर कोण आहे ?

सर०:—ताईमहाराजांचं शेवटचं दर्शन व्हावं, म्हणून सर्व पहारेकऱ्यांनीं माझ्याजवळ तिकडे जायची परवानगी मागितली, आणि मीं ती दिली; गुन्हा माफ असावा सरकार !

हर०:—या गुन्ह्याबद्दल मी तुझे उपकारच मानतों. तुला एक काम केलं पाहिजे.

सर०:—महाराजांची आज्ञा व्हावी, दास तयार आहें !

हर०:—मुकाट्यानं बिछान्यावर माझ्या जागीं पडून रहा. जर गडबड केलीस आणि मी परत येईपर्यंत इथून हाललास तर जागच्याजागीं ठार करीन. नीज या पलंगावर—( सरदार घाबरून पलंगावर निजतो. ) हे रणदेवतांनो ! या वृद्ध वीराच्या वीरबाहूमध्यें संचार करा,—आणि वासंतिकेची सुटका करा ! हा हरदेवराय विजयी होऊन आज वासंतिकेचं रक्षण तरी करील किंवा न्यायाचं पवित्र तेज उज्ज्वल राखणाऱ्या महत्कार्यांत मरण येऊन आपलं नांव अजरामर तरी करील ! [ जातो. ]



## प्रवेश दुसरा.



**स्थळ**—उद्यान.

[ चंडिका येते. ]

चंडि०:—( स्वगत ) मला त्यांनीं पहांटेस चार वाजतां इथं यायला सांगितलं, मग अजून कां बरं येणं होत नाहीं ? ताईमहाराजांना आज अग्निप्रवेश करण्याची शिक्षा होणार ! पण मला आणि रुद्राक्षरायांना जर इथं कुणीं पाहिलं, तर मलासुद्धां नाहीं का जिवंत जाळणार ? अग बाई ! आतां रुद्राक्षराय आले कीं, उद्यांच्या उद्यां लग्न लावून घेतल्यावांचून मी कांहीं राहणार नाहीं ! पावलं कुणाचीं वाजलीं ? रुद्राक्षरायच आले असतील ! ( उघड ) हळू हळू या ! [ जाई प्रवेश करिते. ]

जाई:—( स्वगत ) रुद्राक्षरायच असले पाहिजेत ! माझी मुद्दाम काल गांठ घेतली आणि या वेळीं मला इथं भेटायला सांगितलं ! तेच असले पाहिजेत ! ( उघड ) कोण आहे ?

चंडि०:—अग बाई, ही तर जाई ! ही इथं कशाला आली ! माझ्या पाळतीवर तर ही नसेल ना ? कां माझ्याप्रमाणंच आपल्या प्रियकरास भेटायला आली ?

जाई:—कोण चंडिके ? अशा पहांटेस तूं ग कशाला इथं ?

चंडि०:—कशाला म्हणजे ? पहाटेच्या वेळीं जाई बरीच फुलते, तिचीं फुलं खुडायला !

जाई:—जाईचं झाड त्या पलीकडच्या कोंपऱ्यांत आहे. तिथं जा फुलं गोळा करायला !

चंडि०:—समजलं ! समजलं ! मी इथं नको असेन ! ह्या जाईच्या फुलाचा सुवास घेणारा कुणी भोक्ता येणार आहे वाटतं आतां इथं ?

जाई:—तूंच विचारतेस तेव्हां खरंच सांगतें, जाईचा भोक्ता येईलसा कांहीं वाटत नाहीं. पण या चंडिकेचा भक्त मात्र यायचं चिन्ह दिसतंय !

चंडि०:—बरं ! बरं ! माझा भक्तच यायचा आहे हो !

जाई:—मग मी सांगतें, माझा भोक्ताच यायचा आहे हो ! पण थांब, पावलं वाजलीं. बहुतकरून तेच असतील !

चंडि०:—जाई, तेच असतील, यावरून आलं माझ्या सगळं लक्षांत ! मग आज काय इथं दोन जोडपीं—पण मला बाई भीति वाटते. कुणी पाहिलं तर उगीच जिवंत जळावं लागणार !

जाई:—नको घाबरूंस ! पण ही तर चमेलीच आली ! ( चमेली येते. ) कां ग तूं कशाला आली आहेस ?

चमे०:—तुम्ही कशाला आला आहांत ?

जाई:—अशी फुरंगटतेस कशाला ? आम्ही कशाकरितां आलों याची तुला कां चौकशी ? आलों आहोंत तुझ्यावर पाळत राखायला !

चमे०:—आणि ती कशाबद्दल ? मी इथं जर एखाद्या पुरुषाला भेटलें, तर काय मी पापबुद्धीनंच भेटलें म्हणून म्हणाल तुम्ही ?

चंडि०:—आम्ही नाहीं म्हणणार ? पण लोक काय म्हणतील ?

चमे०:—पण ऐका, पावलं वाजताहेत ! बहुतकरून तेच असतील !

[ जाई व चमेली चापचूप होतात. ]

चंडि०:—बोला ! बोला आतां ! आतां दांतखिळी बसली वाटतं ? पण ते पहा आमचेच आले !

जाई:—अग आमचे !

चमे०:—नाहीं आमचे ! तेच !

[ रुद्राक्षराय येतो, एकमेकींकडे पहात राहतात. ]

रुद्रा०:—चंडिके ! लाडके ! तूं का !

जाई:—काय चांडिका लाडकी ?

चमे०:—आणि मग मी ?

रुद्रा०:—तूंही माझी लाडकी आहेसच.

[ तिच्याजवळ जातो. ]

जाई:—आणि मी ?

रुद्रा०:—तूंही आहेसच ! [ तिच्याजवळ जातो. ]

चंडि०:—तुम्हाला यांनींच कां बोलावलं इथं ?

जाई:—अग हो !

चमे०:—मलासुद्धां यांनींच बोलावलं !

रुद्रा०:—मग मी कुठं नाहीं म्हणतों ? पण मला आतां वेळ नाहीं ! वासंतिकेच्या लग्नाला मी निघालों आहे ! तुम्हांला यायचं असेल तर चला सहकुटुंब जाऊं !

चमे०:—काय ? ताईमहाराजांचं लग्न ? मग त्यांची मुक्तता झाली एकूण ?

रुद्रा०:—नाहीं ! अजून नाहीं मुक्तता झाली ! पण अग्निनारायणाबरोबर त्यांचं लग्न लागून सूर्योदयाबरोबर त्यांची मुक्तता होणार ! हं ! हं ! हं !

जाई:—मेला हंसतो आहे ! राक्षसा ! तुला काय म्हणावं ?

रुद्रा०:—काय वाटेल तें ! बायकांच्या बोलण्याची आम्ही मुळींच पर्वा करीत नाहीं ! बोलण्याचीच काय पण त्यांच्याकडे पहाण्याचीसुद्धां ! जमीन-जुमला, गुरं-ढोरं, घोडीं-गाढवं यांच्याप्रमाणं आमची ती मालमत्ता आहे. आमच्या मालकीचा बोकड नाहीं का आम्ही मारीत ? ढेंकूण पिसवां चिरडून टाकतांना आम्हांला काय वाटायचं आहे ?

चंडि०:—राक्षसा ! इतकी आमची किंमत का ?

रुद्रा०:—तुमची किंमत ? आतां तुम्हांला सगळ्यांना जिवंत जाळूं कां ? वासंतिकेला जाळायची तरी कुणीं तयारी केली ? मींच ना ? हातांत मशाल घ्यायची आणि भडभडभडभड पेटवायची ! मजा आहे ! दिवाळसणाची फुलबाजी जाळण्याची गम्मत--झालं !

चंडि०:—जाई, चमेली, या मांगाच्या मनांत आलं तर हा आपल्याला खरोखरच जाळील. आपण मेल्याप्रमाणंच आहों ! राक्षसाला असा सोडून उपयोग नाहीं. हं बघतां काय ?

[ सर्वजणी त्याच्यावर घसरतात, आणि त्याला बेदम मारतात. ]

रुद्रा०:—अन्याय ! अन्याय ! आमच्यावर जुलूम ! पुरुषांवर हल्ला ! भयंकर अन्याय !



**त्रमे०:**—चला याच मेल्याला घेऊन गोकर्णेश्वरावर ! आणि तिथं याला जाळून टाकूं ! [ पान ७९.

चमे०:—घे मेल्या ! ( मारते, ) माझ्यावर प्रेम कां दाखवलंस रे ?

रुद्रा०:—थोडी गम्मत केली !

जाईः—आणि माझ्यावर ? [ मारते. ]

रुद्रा०:—नाटकांतलं भाषण म्हणत होतों.

चंडि०:—आणि आतां चार वाजतां बोलावलंस तें ?

रुद्रा०:—तें त्यांतलंच होतं ! पाठ केलं त्याप्रमाणं म्हटलं ! माझ्या पदरचं कांहीं एक नाहीं !

चंडि०:—याचीच पाठ मोकळी करूं या !

[ मारतात. ]

चमे०:—चला याच मेल्याला घेऊन गोकर्णेश्वरावर ! आणि तिथं याला जाळून टाकूं ! [ धरून नेतात.]



## प्रवेश तिसरा.



**स्थळ**—गोकर्णेश्वरमंदिरासमोरील पटांगण.

[ काष्ठांची चिता रचलेली आहे; नागरिक, सैनिक, अधिकारी, राजमंडळाचे सभासद, राजमंत्री आणि त्यांच्यामागून वासंतिकेच्या सख्या, श्रीकृष्णराय, रुद्राक्षराय, असे प्रवेश करितात. ]

एक सैनि०:—मागं हटा ! मागं हटा ! स्वारीला वाट द्या !

श्रीकृ०:—मी इथं कां आलों आहें, हें सर्वांना ठाऊक आहेच, तथापि आणखी एकवार शिंग फुंकून माझं द्वंद्वाचं आव्हान येथील सर्व वीरांना चारण कळवील !

[ चारण शिंग फुंकतो, कुणी वीर पुढं येत नाहीं. असें पाहून वासंतिका चितेवर चढते. ]

वासं०:—प्रेमळ प्रजाजनहो ! स्वर्गारोहण करणं मला म्हणून प्रेमानं हें चितेचं विमान माझ्याकरितां तयार केलं, नांत मी आरूढ झालें आहें. आणि तुम्ही प्रेमळ करांनीं अ ज्वालांच्या शीतळ सहवासांत निमग्न होऊन मी आपला निरोप घ्य विसरेन ! स्त्री आणि पुरुष यांची या जगाला सारखीच अ असतांना या केरळ-देशांत मात्र स्त्रियावांचून पुरुष राहूं शकती निर्मळ प्रेमाला व्यभिचार ठरविणाऱ्या या तुमच्या दंडनीतील असो; कोमलांतःकरणी स्त्रीवर्गाला जनावर समजणाऱ्या य पुरुषजातीला धिक्कार असो ! स्त्रीवर जारिणीपणाचा आरोप ष ाला जारपणाच्या आरोपापासून मुक्त ठेवणाऱ्या तुमच्या न्य धिक्कार असो ! जारिणी स्त्रीला जिवंत जाळण्याची शिक्षा दे तुमच्या दयाळु दंडनीतीनं जार पुरुषांना कोणची शिक्षा ठरवले आपल्या राक्षसी विषयवासनेला अजाण स्त्रीचा बळी देणाऱ्या ही तुमची राक्षसी दंडनीति लाजून गोंजारीत आहे ! जर तुम दया-माया असेल, जर तुम्हांला न्यायाची चाड असेल, ज आयाबहिणींबद्दल तुमच्या मनांत आदर असेल, तर मृत्यू पाऊल ठेवलेल्या या तुमच्या लाडक्या वासंतिकेची शेवटची मान्य करा; आणि असलं अमानुष अनुशासन रद्द करा. जग असं हिडिस अनुशासन नसेल. केरळ-देशाच्या नांवावर हा ए काळिमा आहे. हा कलंक धुवून टाकणं तुमचं पवित्र कर्तव्य अ कर्तव्य पराङ्मुख झाल्यामुळें तुमच्या हातून झालेल्या निरपराधी ज्वालांनीं भडकणारा हा पापाग्नि माझी आहुति घेऊन तरी तृप्त हो यापुढं त्याच्या संपर्काची बाधा माझ्या अनाथ भगिनीवर्गाला असमर्थ होवो ! जगदंबा तुमचं कल्याण करो ! द्या अग्नि

[ दूरवर शिंग

हंसा०:—अग्नि देऊं नका ! खबरदार कुणी अग्नि द्याल

श्रीकृ०:—शिंग ! हें शिंग कां वाजलं ? वासंतिकेच्या वीर माझ्याबरोबर द्वंद्व करायला सिद्ध तर नाहीं झाला ?



त्याच्या उरांत तरवार भोंसकणार तोंच कोकिळा धांवत येऊन त्याचे पाय धरते. [ पान ८२.

येतो. ) हा कोण धाडसी वीर गुप्तवेषानं आला आहे? वीरराय तर नसेल? वीरा! तूं जर वासंतिकेच्या वतीनं युद्धाला आला असशील तर चल ये समोर!

हर०:—हा मी पुढं आलों! [ वीरराय येतो.]

वीर०:—वीरा! मागं सर! हा वीरराय जिवंत असल्यावर वासंतिकेच्या बाजूनं कुणीही लढण्याचं कारण नाहीं. नराधमा कृष्णराया, तुझ्या पापाचे घडे आज खास भरले! ( वासंतिकेस ) पावित्र्यमूर्ति वासंतिके! तुझी क्षमा मी कोणत्या तोंडानं मागूं? या सैतानाच्या कपटजालांत सांपडून मीं तुझे अनंत अपराध केले आहेत, त्यांचा उच्चारही मला करवत नाहीं!

वासं०:—माझे अपराध आणि आपण? ते कसे केले? आणि या राक्षसाच्या कपटजालांत आपण कसे सापडलांत, हें मला कांहींच कळत नाहीं! पण महादेवीच्या कृपेनं शेवटीं त्यांतून आपण सुटून माझी प्राणाहूनही प्रिय अब्रू राखायला धांवत आला, ही माझी केवढी पूर्वपुण्याई! मला कुलटा ठरवून माझ्या प्राणालाच दंश करणाऱ्या या कृष्णसर्पाला शासन करायला माझा वीर मला मिळाला; आतां मी काळालाही भीत नाहीं! [ चितेवरून उतरते. ]

वीर०:—वासंतिके! शिकारीमध्यें तुझ्या रक्तानं भरलेलं वस्त्र माझ्या शरिरांतील रक्त तापवून शत्रूच्या रक्तांत न्हाण्याकरितां आतुर झालं आहे! माझ्या हातांतील हा व्याघ्रचर्माचा ध्वज तुझ्या छळाच्या झंझावातानं फडफडूं लागून तुझ्या शत्रूच्या मृत्यूचं तीर गांठण्याकरितां त्यानं माझ्या शरिराची नौका या संग्रामसागरांत जोरानं रेटीत आणली आहे! तुझ्या शत्रूच्या दोन्ही हातांत प्रत्यक्ष विद्युल्लता तळपत असल्या आणि विश्वांतलि सारी राक्षसी शक्ति त्याच्या बाजूनं लढत असली तरीही त्याच्या पापकर्माचं शासन आतां त्याला माझ्याकडून मिळाल्यावांचून रहाणार नाहीं!

श्रीकृ०:—कोणाच्या पापकर्माचं शासन कोणाला मिळतं तें आतां लवकरच कळेल!

वीर०:—स्त्रीहत्या करणाऱ्या मानवी राक्षसा ! पण माझं हें खड्ग तुझ्या पाषाणहृदयांत शिरण्यापूर्वी तुझं कृष्णकर्म जगापुढं आलं पाहिजे ! आणा ! त्या बेरडाला पुढं आणा ! ( काढण्यांनीं बांधलेल्या श्रीपतीस सैनिक पुढें आणतात. ) न्यायमूर्ति ! हा एक बेरड आणि याच्या जोडीला दुसरा एकजण, असे दोघे ह्या राक्षसानं मारेकरी म्हणून माझ्यावर घातले होते ! त्या दुसऱ्याला माझ्या खड्गानं तात्काळ मोक्ष दिला ! याला मात्र न्यायासनापुढं आणण्याकरितां मुद्दाम राखून ठेविला ! याला तुम्ही योग्य तें शासन करालच !

श्रीकृ०:—झूट ! झूट ! चल हो द्वंद्वाला तयार !

[ दोघे लढतात, वीरराय त्याला खालीं पाडतो, व त्याच्या उरांत तरवार भोंसकणार तोंच कोकिळा धांवत येऊन त्याचे पाय धरते. ]

कोकि०:—वीरराय ! वीरराय ! या कोकिळेकडं पहा ! आणि आपला हात मागं घ्या ! त्यांनीं आपले अनंत अपराध केले असले— ताईमहाराजांवर केवळ अग्नीचा वर्षाव केला असला, तरी माझं त्यांच्यावर प्रेम आहे ! मी त्यांना मनानं वरलं आहे इकडे लक्ष द्या ! पुरुषांनीं जरी मारेकरी घालून स्त्रियांचा घात करण्याचा प्रयत्न केला तरी पुरुषांचा घात व्हावा असं स्त्रीला कधींही वाटणार नाहीं. वीरराय ! या गरीब अबलेला चुडेदान द्या ! एवढी भीक घाला !

वीर०:—कोकिळे, या कृष्णरायाचीं कृष्णकारस्थानं किती भयंकर आहेत हें तुला ठाऊकच आहे ! प्रत्यक्ष तुमची भावी राणी केरळ-देशाच्या प्रजेचा प्राण ही वासंतिका हिचा अंत करून या राज्याचा अपहार करण्याकरितां यानं केवढा व्यूह रचला तो पाहिलास ना ? ( हंसाचार्यास ) इतकंच नव्हे तर कोकिळेच्या हातून पुढं कदाचित सर्व गोष्टी उघडकीला येतील म्हणून नकळत तिला यमसदनाला पाठवावं म्हणूनही यानं प्रयत्न केला ! कोकिळे ! या मांगावर—या सर्पावर प्रेम करून त्याला वाचविण्यानं तुझ्या प्रेमाचं काय चीज होणार ?

कोकि०:—माझ्या डोळ्यांसमक्ष त्यांचे प्राण जावेत त्यापेक्षां मारे-



त्याच्या उरांत तरवार भोंसकणार तोंच कोकिळा धांवत येऊन त्याचे पाय धरते. पान ८२ अंक पांचवा.

कन्यांच्या हातून काल मी मेलें असतें तर बरं झालं असतं ! वीरराय ! आपलं खड्ग प्रथम माझ्या उरांत खुपसा आणि मग अपत्याला तिकडच्या जिवाचं काय करायचं तें करा !

वीर०:—ऊठ ! ऊठ ! कोकिळे ! वासंतिकेसंबंधानं माझं मन साफ केलंस हे तुझे माझ्यावर अनंत उपकार आहेत ! तुझं मागणं अमान्य करून कृतघ्नतेचा दोष माझ्या माथ्यावर मी कसा घेऊं ? हा कृष्णराय जर तुझ्याशीं लग्न करायला तयार असेल, तरच मी त्याला सोडीन. ( कृष्णरायाला उठवतो. ) कृष्णराय, ही कोकिळा जरी उच्चकुलोत्पन्न नसली तरी सद्गुण हे कुलावर अवलंबून नसतात.

वासं०:—ही माझी बहीण आहे ! वासंतिकेचं राज्य—वासंतिकेचं नाहीं—सर्व सद्गुणी पतिव्रतांची त्याच्यावर सत्ता आहे !—या माझ्या बहिणीच्या हाताचा स्वीकार करा ! ( वासंतिका तिचा हात त्याच्या हातांत देते. व हरदेवरायास ) हे अनोळखी वीरा ! माझा खरा वीर मला मिळाल्यामुळं जरी तुझं साहाय्य मला घेतां आलं नाहीं तरी तुझ्या या उदारपणाबद्दल मी तुझी ऋणी आहें ! एवढ्या केरळदेशांत माझ्या वीररायाशिवाय तूंच एक वीर माझ्याकरितां धांवून आलास ही तुझी भक्ति मी कधींही विसरणार नाहीं !

[ रुद्राक्षरायाला घेऊन चमेली, चंडिका, जाई येतात. ]

वीर०:—अरे हें काय ?

रुद्रा०:—वीरराय, या बायकांनीं मला इथं जाळण्याकरितां आणला आहे, असं म्हणतात ! जर तुमच्या अंगांत पाणी असेल, तुमच्या अंगीं पुरुषत्व असेल, तुमच्या अंगांत जात्याभिमान असेल, तर या स्त्रियांनीं माझ्यासंबंधानं जो अन्याय चालविला आहे, त्याबद्दल त्यांना योग्य शिक्षा करा, यांना या चितेवर उभ्या करा, आणि मला अग्नि लावण्याची परवानगी द्या ! माझे हात फुरफुरत आहेत !

वीर०:—शाबास ! खरा पुरुष आहेस !

वासं०:—चंडिके, चमेली ! द्या त्याला सोडून ! तो एक माथेफिरू आहे ! चला, आतां आपण बाबांची भेट घेऊं आणि त्यांच्याकडून

हें अन्यायी अनुशासन रद्द करवून स्त्रीपुरुषांमधील हा विषमभाव नाहींसा करूं !

[हरदेवराय तोंडावरील पडदा काढतो, सर्व आश्चर्यचकित होतात.]

हर०:—चकित होण्याचं कांहीं एक कारण नाहीं. अनाथाचं रक्षण हेंच राजाचं कर्तव्य, तें करण्याकरितां मी इथं आलों यांत नवल वाटण्यासारखं कांहीं एक नाहीं ! कृष्णरायाच्या पातकाबद्दल त्याला शासन करण्याचं सोडून कोकिळेच्या देणगीनं वासंतिकेनं त्याचा गौरव केला ही गोष्ट अपूर्व आहे !

श्रक्रि०:—मला आज नवीनच जन्म मिळाला आहे ! या बालकाला जो मार्ग आखून द्याल त्याच मार्गानं तो वागत जाईल !

हर०:—या शुभ प्रसंगीं ज्या अनुशासनामुळं सद्गुणी माणसांवर असले भयंकर प्रसंग आले तें अनुशासन आम्ही रद्द करतों. आणि वीरराय ! तुमचे उपकार मी आतां कसे फेडूं ? माझ्या प्राणाची प्राण अशी माझी लाडकी वासंतिका व तिजबरोबरच माझं हें सगळं राजवैभव ह्यांचा स्वीकार करून मला आपल्या ऋणांतून मुक्त करा ! तुमचं शील, तुमचं शौर्य आणि तुमची देशभक्ति ह्यांचा मोबदला देणं हें तर माझ्या केवळ शक्तीबाहेर आहे ! श्रीगोकर्णेश्वरच तुम्हां उभयतांना अखंडसौख्यांत ठेऊन त्यांचा तुम्हांला मोबदला देवो ! आणि सर्वांचं शुभ करो !

सर्व०:—तथास्तु ! [शेवटचा पडदा पडतो.]



# वासंतिका.

मासिक मनोरंजनामधील प्रसिद्ध लेखक श्रीयुत **भालचंद्र** ह्यांनीं प्रस्तुत नाटक लिहिलें आहे. **पौराणिक युग** व **ऐतिहासिक युग** ह्यांच्या संधिकाळीं **केरळ-देशांत**--म्हणजे सांप्रतच्या **मलबार प्रांतांत**--राज्य करणाऱ्या **हरदेव** राजाची कन्या **वासंतिका** हिच्या चरित्रांतील एका प्रसंगावर ह्या नाटकाची उभारणी केली आहे. त्या प्रांतांत रहाणाऱ्या त्या काळच्या **आरंभींच्या चालीरीतींचें** ह्या कृतींत यथोचित **प्रतिबिंब** उतरल्यानें व **वीर, करुण** आणि **हास्य** ह्या **रसांचा** हींत यथायोग्य **संगम** झाल्यानें **पुस्तकरूपानें** किंवा **प्रयोगरूपानें** ही **आबालवृद्धांस हृदयंगम** व **बोधप्रद** झाल्यावांचून रहाणार नाहीं. प्रसंगानुरूप हींत **श्रीभारत नाटक मंडळींतील अभिनयकुशल नटांचीं सुंदर** छायाचित्रें घातलीं आहेत. किं० ८१२.

# राधा-माधव.

हें **नवीन** नाटक '**श्रीभारत नाटक मंडळी**' चे मालक रा. रा. **यशवंत नारायण टिपणीस** यांनीं लिहिलें असून त्यांची **ही तिसरी कृति** पहिल्या दोहों-पेक्षांही **सरस** वठली आहे यांत संशय नाहीं. राधेवरील कृष्णाचें प्रेम **व्यभिचारी** होतें, ही कल्पना हिंदुसमाजांत सर्वसाधारण **अगदीं दृढ** झाली असून ह्या **भ्रामक कल्पनेवर** रचलेल्या **कृष्णलीलांचें** कौतुक करतांनाही कित्येक अज्ञानी स्त्रीपुरुष दृष्टीस पडतात. परंतु ही भ्रामक कल्पना त्या **पवित्र** व सर्वशक्तिमान् **भगवंताच्या** चरित्राला काळिमा आणणारी असून ही अमंगलसमजूत **हिंदु** समाजांतून अगदीं नष्ट करणें हें प्रत्येक **समंजस समाजधुरीणाचें पवित्र कर्तव्य** आहे. रा. **टिपणीस** यांचा अशाच प्रकारचा प्रयत्न असून जगामध्यें अनेक स्त्री पुरुषांमध्ये **निर्मळ प्रेम, आदर व भक्ति** हीं असूं शकतात किंवा नाहीं हें वरील नाटकांत रा. **टिपणीस** यांनीं मोठ्या चातुर्यानें दाखविलें असून **श्रीकृष्ण** ही **व्यक्ति** किती **पवित्र, असामान्य** व **दैविक** होती, याचा **ठसा** नाटक पाहणारांचे किंवा वाचणारांचे मनावर **पूर्णपणें उमटल्या**वांचून रहात नाहीं. **भोंदू साधूंचा** सुळसुळाट हिंदुस्थानांत कित्येक शतकें माजलेला असून ह्या नाटकांत **लंबोदर** हें पात्र काल्पनिक असलें तरी भोंदू गुरूचा हा एक उत्तम **मासलाच कवीनें** वरील नाटकांत दाखविला आहे. एकंदरीनें हें नाटक **आबालवृद्ध स्त्री-पुरुषांना** पाहण्यास व वाचण्यास अत्यंत बोधप्रद व मनोरंजक असें झालें आहे. नाटकांत **श्रीभारत नाटक मंडळींतील नटांचे** त्या त्या प्रसंगांचे एकंदर ११ **फोटो** घातले असून शिवाय मुखपृष्ठ तीन रंगांच्या सुंदर चित्रानें **शृंगारिलें** आहे. किंमत ८१२, व्ही. पी. सह ८१४.

**म्यानेजर—चित्रशाळा प्रेस, पुणें.**